भक्तजनांचियाकाजा ॥ जेवींकरितीआवरणपूजा ॥ तैसेंसैन्यरचिलें वोजा ॥ कृष्णभाजारुक्मिणी ॥ ५६ ॥ नातरीउपासनायंत्र ॥ तैसें दिसेसैन्यसूत्र॥भीमकीमध्यपीठपवित्र ॥ कृष्णक्षेत्रनिजबीज ॥ ५७॥ जैसीसाधनचतुष्टयसंपत्ती ॥ परमात्मासन्मुखकरितीवृत्ती ॥ तैसेचौ घेबंधूघेऊनयेती ॥ कृष्णसन्मुखभीमकी ॥ ५८ ॥ नातरीजैसेचारी वेद ॥ उपनिषदेंकरितीबोध ॥ वृत्तिस्वयेंदेखेनिजपद ॥ तैसेबंधूभी मकीसी ॥ ५९ ॥ नातरीचारीपुरुषार्थजैसे ॥ भक्तापाशींयेतीआपै से ॥ चारीबंधूजाणतैसे ॥ भीमकीसरिसेचालती ॥ ६० ॥ विवेक वैराग्यांचेमेळीं ॥ तैसारुक्मरथरुक्ममाळी ॥ मागेंपुढेसांभाळी ॥ पारिकेजवळीयेऊंनेदी ॥ ६१ ॥ स्वानंदआणिअनुभवू ॥ जीवाहून आवडतीबहू ॥ तैसेरुक्मकेलीरुक्मबाहू ॥ दोघेभाऊदोहींभागीं



॥ ६२ ॥ ऐसेभीमकीच्याचहूंभागीं ॥ चौघेभाऊरंगलेरंगीं ॥ भीम कीसवेंचालतीवेगीं ॥ धन्यजगींरुक्मिणी ॥ ६३ ॥ वडीलबंधूचौ घांहुनी ॥ जोकांअतिगर्वीअभिमानी ॥ तोसांडिलासेत्यजुनी ॥ सा धुजनींजेंविंनिंदा ॥ ६४ ॥ कृष्णद्वेषियातोखरा ॥ मिळणीमिळाला सेअसुरां ॥ म्हणुनीत्यजिलापरबाहेरा ॥ नव्हेसोयरानिजाचा ॥ ६५॥ भोगत्यजुनीवैरागी ॥ योगसाधनानिघेयोगी ॥ तैसीमायामाहेरसां डूनवेगीं ॥ चरणचालीनिघाली ॥ ६६ ॥ लोकप्रतिष्ठामहंती ॥ बै सावेंअश्वगजरथीं ॥ जेणेंहोयकृष्णप्राप्ती ॥ भीमकीगतीतेजाणे ॥ ६७ ॥ परक्याठायींकृष्णठाके ॥ हेंबोलणेंसमूळलटिकें ॥ ऐसें जाणोनीनिष्टंकें ॥ चरणींचमकेवैदर्भी॥६८॥कृष्णचरणींजडलेंमन ॥ यालागींवाचेपडलेंमौन ॥ दृढलागलेंअनुसंधान ॥ सहजस्थितीचाल

ली ॥ ६९ ॥ आत्मसाक्षात्कारवृत्ती ॥ अनिवारअहिंसादिकयेती ॥ तेवींभीमकीसवेंसमस्तीं ॥ सखियाधांवतीआनंदें ॥ ७० ॥ जेकांनिरपेक्षमानसीं ॥ सिद्धीतिष्ठतीसेवेशी ॥ तैशासखियाभीमकीशी ॥ उपचारेंसीचालती ॥ ७१ ॥ वडिलांमाजीवडिलपणीं ॥ निजशांतीचीस्वामिणी ॥ वागवीतसेरुक्मिणी ॥ अग्रगणीसकळिकां ॥ ७२ ॥ बोधपुत्राचीजननी ॥ ब्रह्मवेत्त्यांचीब्राह्मणी ॥ अकामकामाचियाकामिनी ॥ सर्वेसुवासिनीचालती ॥ ७३ ॥ जैसाअनुहाताचागजर ॥ तैसींतुरेंवाजतिअपार ॥ नादेंकोंदलेंअंबर ॥ शब्दाकारनभझालें॥७४॥ पहिलेउठिलेघंटानाद ॥ मागेंकिंकिणींचेशब्द ॥ मधूनशंखांचेअनुवाद ॥ वीणावेणूरुणझुणती ॥ ७५ ॥ नादेंउठिल्याझल्लरी ॥ मृदंगध्वनीत्यामाझारी ॥ निशाणींदुमदुमिल्याभेरी ॥ नादभीतरींनस



माये ॥ ७६ ॥ कृष्णकीर्तीचियाकीर्तनीं ॥ चौघीजणीगातीगाणीं ॥ त्यांपुढेंनाचतीनाचणीं ॥ चारीमुक्तीउदास ॥ ७७ ॥ कृष्णवर्णावयाश्रेष्ठ ॥ चौघेजणगर्जतीभाट ॥ अठरामागधअतिउद्भट ॥ वंशावळीवर्णिती ॥ ७८ ॥ कळावाढवितीशब्द ॥ साहीजणींशीविवाद ॥ युक्तीप्रयुक्तींचेबोध ॥ नानाशब्दछंदचि ॥ ७९ ॥ पातलीअंबिकेचेंरंगण ॥ केलेंकरचरणक्षालन ॥ रुक्मिणीचेंसावधमन ॥ शुद्धाचमनतिनेंकेलें ॥ ८० ॥ श्रद्धापूजेचेसंभार ॥ शुद्धसुमनाचेपैंहार ॥ चिद्रत्नांचेअलंकार ॥ चिदंबरपूजेसी ॥ ८१ ॥ देवालयाआलीहरिखें ॥ अंबापाहतांकृष्णचिदेखे ॥ येणेंरूपेंयदुनायकें ॥ पाणिग्रहणकरावें ॥ ८२ ॥ सावधहोऊनपाहेचित्ता ॥ म्हणेहेआमुचीकुलदेवता ॥ आपुलेंरूपदावीअनंता ॥ होईलभर्तानिश्चित ॥ ८३ ॥ हरिखेंवो

आनंदलीपोटीं ॥ मगबांधिलीशकुनगांठी ॥ अतिउल्हासेंगोरटी ॥ पूजाविधीसींमांडिली ॥ ८४ ॥ षोडशोपचारींपूजा ॥ करितीजा हलीभीमकात्मजा ॥ विधीसांगतीद्विजभाजा ॥ गरुडध्वजप्राप्तीसी ॥ ८५ ॥ वस्त्रेंअलंकारभूषणें ॥ नानाउपचारबलिदानें ॥ दीपावली नीरांजनें ॥ सावधानेंअर्पिलीं ॥ ८६ ॥ कृष्णधरूनियांमानसीं ॥ भीमकीपूजीद्विजपत्न्यांसी ॥ जेंजेंबोलिलेंविधीसी ॥ तेंतेंत्यांसीदीध लें ॥ ८७ ॥ निंबंनारिंगेंनारिकेळें ॥ अपूपलाडूअमृतफळें ॥ इक्षुदं डआंबेकेळें ॥ दिधलींवाणेंनारींसी ॥ ८८ ॥ मुक्ताफळेंसींआभर णें ॥ सौभाग्यद्रव्यकंठाभरणें ॥ हळदीजिरेंलवणधणे ॥ दिधलींवा णेंनारींसीं ॥ ८९ ॥ होतीनीलोत्पलांचीमाळा ॥ तेघातलीजगदंबे च्यागळां ॥ वरदेईवोघनसांवळा ॥ उचितकाळाआजिच्या ॥ ९० ॥



म्हणोनिविसर्जिलेंमौन ॥ करूंआरंभिलेंस्तवन ॥ नमनामागेंठेवूनम न ॥ सावधानस्तवनासी ॥ ९१ ॥ जयजयवोअव्यक्तशक्ती ॥ जय जयवोअमूर्तमूर्ती ॥ जयजयवोविश्वस्फूर्ती ॥ चिच्छक्तीचिन्मात्रे ॥ ९२ ॥ जयजयवोजगदंबे ॥ जयजयवोआरंभस्तंभे ॥ जयजयवो सौभाग्यशोभे ॥ स्वयंस्वयंभकुमारी ॥ ९३ ॥ जयजयवोअनादि ॥ नाकळशीतूंमनोबुद्धी ॥ देवोदेवींइहींशब्दीं ॥ तूंत्रिशुद्धीनांदसी ॥ ९४ ॥शिवातुझेनीशिवपण ॥ जीवातुझेनीजीवपण ॥ देवातुझे नीदेवपण ॥ निजकारणतूंमाये ॥ ९५ ॥ तुझेनीशब्दांदिकांशोभा ॥ तुझेनीनभत्वआलेंनभा ॥ तूंचिमूळप्रारंभा ॥ विश्वकदंबाजीवनतूं ॥ ९६ ॥ तुझीउघडलियादृष्टी ॥ नांदोंलागेलसकळसृष्टी ॥ तुवांउपे क्षिलियापाठीं ॥ देवाहीनुठीदेवपण ॥ ९७ ॥ ओंपुण्याहंसुमुहूर्ती ॥

लग्नलावणेंतुझेहातीं ॥ मजनोवराश्रीपती ॥ समूळकीर्तीतूंमाये ॥ ९८ ॥ ऐसास्तुतिवादकरितां ॥ कंठींचीमाळआलीहाता ॥ येचिमाळेंश्रीकृष्णनाथा ॥ वरीनआतांनिर्धारीं ॥ ९९ ॥ महाप्रसादजी सर्वथा ॥ म्हणोनिचरणींठेविलामाथा ॥ अशीर्वाददेतीसमस्ता ॥ पतिव्रताद्विजपत्न्या ॥ १०० ॥ येणेंउल्हासेंसुंदरा ॥ वरूंनिघेश्रीकृष्णवरा ॥ स्वानुभवाचासेवकखरा ॥ त्यातेंकराधरूनी ॥ १०१ ॥ भीमकीसौंदर्येंअमूप ॥ जिचेनीजगानांवरूप ॥ तिचेलावण्याचेदीप॥ मुख्यस्वरूपकेवींवर्णूं ॥ १०२ ॥ जीवेंस्रजूंनशतीचतुरानन ॥ कृष्णप्रभावेंस्वरूपपूर्ण ॥ तिचियास्वरूपाचेंवर्णन ॥ एकाजनार्दनकरीतसे ॥१०३॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेअंबिकापूजनंनामषष्ठःप्रसंगः ॥ ६ ॥

## प्रसंग ७ वा.



श्रीरुक्मिणीकांतायनमः ॥ ॥ श्रीकृष्णभक्तीलागींदेखा ॥ नवविधाभ
क्तीशींआवांका ॥ तैशानवरत्नमुद्रिका ॥ भीमककन्यकालेइलीसे
॥ १ ॥ सकळसौंदर्याचीखाणी ॥ बरवेपणतिजपासुनी ॥ स्वरूपरू
पाचीजननी ॥ वीरींरुक्मिणीदेखिली ॥ २ ॥ सुरवरपन्नगांच्या
ठार्यी ॥ हिंडतांसौंदर्याविश्रांतीनाहीं ॥ म्हणवुनीधाविन्नलेंलवला
हीं ॥ भीमकीदेहींविश्रांती ॥ ३ ॥ भीमकीकृष्णासीआलिंगन ॥
तेणेंसौंदर्यासमाधान ॥ तिहींलोकींचेंबरवेपण ॥ भीमकीपाशींधां
विन्नलें ॥ ४ ॥ जीचियासौंदर्यासी ॥ वेधलागलाश्रीकृष्णासी ॥
तीभीमकीवर्णावीकैसी ॥ सीमारूपासींनकरवे ॥ ५ ॥ नाहींस्रष्ट्या
नेंस्रजिली ॥ कृष्णप्रभावेंरूपाआली ॥ बरवेपणेंसीगेचढली ॥ सा
कारलीसौंदर्यें ॥ ६ ॥ गगनशून्यत्वाउबगलें ॥ कृष्णभेटीसीउदित
जाहलें ॥ भीमकीमस्तकासीआलें ॥ निरालंबेंशोभत ॥ ७ ॥ मस्त



कींचेनीलकुंतल ॥ तेंचिनभअतिसुनीळ ॥ तळींमुखचंद्रमानिर्मळ ॥
भीमकीमुखींउगवला ॥ ८ ॥ चंद्रक्षीणकृष्णपक्षीं ॥ म्हणेहापूर्वील
माझाबंधुकीं ॥ म्हणूनीकळवळलीभीमकी ॥ निजमुखींधरियेला
॥ ९ ॥ भीमकीमुखनिष्कळंक ॥ क्षयातीतपूर्णशशांक ॥ कृष्णप्रा
प्तीसीसम्यक ॥ भीमकीमुखींउगवला ॥ १० ॥ चंद्रसंपूर्णपौर्णिमा
एकीं ॥ येरवींक्षयवृद्धीत्यालोकीं ॥ तोसदाभीमकीमुखीं ॥ निजा
त्मसुखींपरिपूर्ण ॥ ११ ॥ चंद्रमंडलामागेंपुढें ॥ जैसेतारांगणांचे
वेढे ॥ तैशींमोतींलगतानवडें ॥ दोहींकडेतळपती ॥ १२ ॥ श्रीकृ
ष्णवेधेंवेधलीखरी ॥ म्हणवूनीविसरलीतेभोंवरी ॥ भोंवरीकृष्णमा
येकरी ॥ येअवसरींतेनाहीं ॥ १३ ॥ भोंवरीनसतांपक्षपाती ॥ पंखे
दोन्हीकडेझळकती ॥ भोंवरीयाभागींभिरवती ॥ भेटीहोईलनिजक
र्णीं ॥ १४ ॥ भीमकीथोरकपाळाची ॥ कृष्णदैवेंतदैवाची ॥ निढ

ळींप्रभाश्यामेची ॥ तोचिकस्तुरीमळवट ॥ १५ ॥ चंद्रबिंबींश्यामरे
खा ॥ तैसाभाळींमळवट्टदेखा ॥ भोंवयारेखिल्याकृष्णरेखा ॥ अति
सुरेखाव्यंकटा ॥ १६ ॥ कृष्णपहावयाजगजेठी ॥ भोंवईसांडिली
व्यंकटी ॥ कृष्णामीनलियादिठी ॥ सहजगांठीसुटेल ॥ १७ ॥
श्रीकृष्णरंगेंसुरंग ॥ अहेवपणतिचेंअभंग ॥ तेचिकुंकुमेंपैंचांग ॥
मुखचंद्रींचंद्रमा ॥ १८ ॥ नभींइंद्रधनुष्यरेखा ॥ तैसाभांगींशेंदुर
देखा ॥ भुलवावयायदुनायका ॥ मोहिनीमुखापूजियेलें ॥ १९ ॥
नातेसरस्वतीवेगीं ॥ आलीकृष्णभेटीलागीं ॥ जीवशीवहांसलिया
दोहींभागीं ॥ मुक्तीलागींतटस्थ ॥ २० ॥ जैसींनक्षत्रेंनभमंडळीं ॥
तैसीमुक्तमोतियांचीजाळी ॥ लेइलीसेभीमकबाळी ॥ तेणेंवेल्हाळी
शोभत ॥ २१ ॥ त्याहीवरीभक्तिफरारा ॥ झळकतसेनेवरत्नांचाख
रा ॥ खुणावीतसेसुरनरां ॥ भजायदुवीरानित्यभावें ॥ २२ ॥ दृश्य



देखतांशिणलेनयन ॥ धणीचेंघ्यावयाकृष्णदर्शन ॥ एकत्रहोऊनिदे
खणेपण ॥ भीमकीलोचनापैंआलें ॥ २३ ॥ पहावयाघनसांवळा ॥
कृष्णश्यामताआलीबुबुळां ॥ आसावलींदोहींडोळां ॥ सबाह्यदेखणें
समदृष्टी ॥ २४ ॥ कृष्णदेखावयानिधान ॥ नयनींसूदलेंअंजन ॥
योगयाचेंझळंबपण ॥ कटाक्षबाणपिसारे ॥ २५ ॥ भीमकीकटाक्षा
च्याघाई ॥ मदनपडलाठायींच्याठायीं ॥ सुरनरांचापाडकायी ॥
निधडापाहींश्रीकृष्ण ॥ २६ ॥ मुखामुखशोभाविक ॥ श्लेष्मागम
नेंशिणलेंनाक ॥ भीमकीमुखायेऊनिदेख ॥ नाकांबिकपैंचढलें २७॥
कृष्णसुवासआवडी ॥ तेणेंनासिकासीआलीगोडी ॥ दोहींनाकपु
ड्यांबुडीं ॥ दिधलीबुडीवसंतें ॥ २८ ॥ अधरदोन्हीझालेसादर ॥
बिंबीफळरंगाकार ॥ तेतंवपरिपाकेंनैश्वर ॥ हेअनैश्वरहरिरंगें ॥२९॥
भीमकीअधरामृतगोडी ॥ श्रीकृष्णाचीजाणेफुडी ॥ एकाएकींवा

ठूनउडी ॥ नेईलरोकडीप्रत्यक्ष ॥ ३० ॥ मुखामाजींदंतपंक्ती ॥ जैशाओंकारामाजीश्रुती ॥ चौकींचेचारीझळकती ॥ सोऽहंअस्मि सोलिंव ॥ ३१ ॥ अधरातळींहनुवटी ॥ गोरेपणेंअसेगोमटी ॥ ते थेंहीश्यामप्रभाउठी ॥ कृष्णवर्णकोंदलें ॥ ३२ ॥ वनिताअधरींसु वर्णफांसा ॥ पडोनमुक्तआलेंनासा ॥ भुलवावयाकृष्णपरेशा ॥ उ पावकेंसादेखिला ॥ ३३ ॥ भीमकीनाकीचेंसुपाणी ॥ सहजदेखेशा रंगपाणी ॥ अधोमुखअधिष्ठानीं ॥ वोळकंबनहरिलागीं ॥ ३४ ॥ हळदीमीनलीहेमळाक ॥ तेणेंउटिलेंमुखकमळा ॥ तेजझळकेगंड स्थळा ॥ सूर्यकळालाजल्या ॥ ३५ ॥ भीमकीमुखकमळसुंदर ॥ कृष्णनयनहेचिभ्रमर ॥ आमोदभावाचेंशेजार ॥ निजमंदिरहरीचें ॥ ३६ ॥ कृष्णमणीअहेवतंतु ॥ कंठींधरिलानतुटतु ॥ दिसोंनेदी लोकांतु ॥ केलाएकांतूनिजकंठीं ॥ ३७ ॥ फिटलाचिंतेचादचकू ॥



म्हणोनीनघालीचितांकू ॥ कृष्णपदींचापदांकू ॥ तेंचिपदकूहृदयींचें ॥ ३८ ॥ पृथ्वीनवखंडेंखंडिली ॥ जडजाडचत्वाउबगली ॥ भीम कीचेअंगींरिघाली ॥ सुनीळझालीकांचोळी ॥ ३९ ॥ पावावयाकृ ष्णदेवो ॥ सांडिलासवतीमत्सरभावो ॥ आलिंगावयाकृष्णरावो ॥ धरापाहाहोधाविन्नली ॥ ४० ॥ एकाअंगींभिन्नपणीं ॥ जीवशिववा ढिन्नलेदोनी ॥ तेणेंझालीघनस्तनी ॥ कुचकामिनीकुचभारें ॥ ४१ ॥ विद्याअविद्यापाखेंदोनी ॥ आच्छादिलेंदोहोंकडोनी ॥ दाटलीत्रिगु णांचीकसणी ॥ कृष्णावांचोनीकोणसोडी ॥ ४२ ॥ भीमकीकृष्णा आलिंगन ॥ तेणेंजीवशिवांसमाधान ॥ यालागींदोनीउचंबळलेजा ण ॥ कृष्णस्पर्शनवांछिती ॥४३॥ मुक्तनांवमुक्ताफळा ॥ नेणती मुक्तीचाजिव्हाळा ॥ म्हणोनपडलीभीमकीगळां ॥ भेटीगोपाळामा ळघाली ॥ ४४ ॥ पूर्वींक्षीरसिंधूचीबाळा ॥ नेसलीक्षीरोदकपाटो

ळा ॥ तोंतोपहावयाघनसांवळा ॥ कांसेलागलाक्षीराब्धी ॥ ४५ ॥
माझीकन्याहेगोरटी ॥ ह्मणीकोणाचीलागेलदृष्टी ॥ म्हणोनिघालित
सेकंठीं ॥ रत्नमाळाक्षीराब्धी ॥ ४६ ॥ प्रकृतिपुरुषांपडलीमिठी ॥
तैसेंबिरडेंकांचोळियेदाटी ॥ कृष्णसोडीलजगजेठी ॥ आयांबायांन
सुटेची ॥ ४७ ॥ शमदमादिसहासुभटें ॥ हस्तकडगेबाह्यवटें ॥
करींकंकणेंउद्भटें ॥ कृष्णनिष्ठेंरुणझुणती ॥ ४८ ॥ क्षणोक्षणींदिशा
उजळे ॥ तैसींजडितदशांगुळें ॥ दशावतारांचियेलीळें ॥ जडितकेलें
मुद्रिकां ॥ ४९ ॥ पाहतांतळ्हातींच्यारंगा ॥ उणेंआणिलेंसंध्यारा
गा ॥ करीचरणसेवाश्रीरंगा ॥ तळवातळ्हातीसदां ॥ ५० ॥ आ
तूनियांहेमकळा ॥ आटणीआटिल्याबारासोळा ॥ वोतींवकेलीकटि
मेखळा ॥ मध्यंघननीळाजडियेल्या ॥ ५१ ॥ दोहींकडेमुक्तखग ॥
तेणेंशोभतमध्यभाग ॥ भीमकीभाग्याचीसभाग्य ॥ तेणेंश्रीरंगवेधि



ला ॥ ५२ ॥ चरणींगर्जतीनूपुरें ॥ वांकीआंदुवाचेनीगजरें ॥ झालें
कामासींचेइरें ॥ धनुष्यपुरेंवाहिलें ॥ ५३ ॥ कृष्णधरूनियांचि
त्तीं ॥ चालतसेहंसगती ॥ चैद्यमागधपाहतो ॥ मदनेंख्यातीथोरके
ली ॥ ५४ ॥ माझीअभिलाषितीजननी ॥ म्हणोनिविंधिलेकामबा
णीं ॥ वीरपडिलेधरणीं ॥ कामबाणींमूर्छित ॥ ५५ ॥ कामेंहरित
ल्यादृष्टि ॥ धनुष्येंगळालीपैंमुष्टीं ॥ भीमकीशखावीगोरटी ॥ हेंही
पोटींविसरले ॥ ५६ ॥ रथींचेउलंडलेथोरथोर ॥ अश्वांखालतेपडि
लेवीर ॥ गर्जीचेकलंडलेमहाशूर ॥ रितेकुंजरगळदंडी ॥ ५७ ॥ भी
मकीपाहातसेसभोंवतें ॥ तंववीरभेदलेमन्मथें ॥ कृष्णत्रिशुद्धीनाहीं
जेथें ॥ जेणेंकामातेंजिंकिलें ॥ ५८ ॥ रमारमणींएकांतीं ॥ मीन
ल्याकामनुपजेचित्तीं ॥ यालागींनामेंतोश्रीपती ॥ भावनिश्चितीभी
मकी ॥ ५९ ॥ कामबाणींनव्हेच्युत ॥ यालागींनावेंतोअच्युत ॥

भोगभोगूनभोगातीत ॥ कृष्णनाथनिर्धारें ॥६०॥ कृष्णपाहावयालो
भेंउठी ॥ आलेआडवेकेशसलोभदृष्टीं ॥ धरूनऐक्याचियेमुष्टीं ॥ सुमनें
वीरगुंठीबांधिली ॥ ६१ ॥ कृष्णापहावयाभावएक ॥ तोतंवअर्कोचा
हीआदिअर्क ॥ नयनींनयनाप्रकाशक ॥ यदुनायककेवींदिसे ॥ ६२॥
निजभावेंपाहेगोरटी ॥ तंवघनश्यामपाहेदृष्टीं ॥ लाजावृत्तीझाली
उफराटी ॥ तंवजगजेठीपावला ॥ ६३ ॥ उपरमोनियांपाहेसुंदरी ॥
तंवअंगींआदळलाश्रीहरी ॥ प्रेमेंसप्रेमघाबरी ॥ करींधरीनिजमाळा
॥ ६४ ॥ वीराभिमानियाझालाहस्त ॥ मध्याह्नींआलागभस्त ॥
सुमुहूर्तअभिजित ॥ समयोवर्ततलग्नाचा ॥ ६५ ॥ काळसावधान
सांगत ॥ सूर्यलग्नघटिकापाहत ॥ वियोगअंतःपटसोडित ॥ भावा
र्थम्हणतओंपुण्या ॥ ६६ ॥ भीमकीपाहेकृष्णवदन ॥ नयनींगुंतले



नयन ॥ दोहींचाएकझालाप्राण ॥ पाणिग्रहणजीवशिवां ॥ ६७ ॥
ऐसियाभावाचेनिवाडे ॥ माळाघालीवांडेकोडे ॥ वीरमूर्छेंव्यापिले
गाढे ॥ आडवापुढेंकोणीनये ॥ ६८ ॥ यापरीशारंगपाणी ॥ रथीं
वाहोनियांरुक्मिणी ॥ निघताझालातत्क्षणीं ॥ परीप्रगटचीकोणीन
देखे ॥ ६९ ॥ एकाएकींवनमाळी ॥ रथींवाहोनिभीमकबाळी ॥
आलायादवांजवळी ॥ पिटिलीटाळीसकळिकीं ॥ ७० ॥ त्राहाटि
ल्यानिशाणभेरी ॥ गगनगर्जेमंगळतुरीं ॥ देवपुष्पेंवर्षतीअंबरीं ॥
जयजयकारप्रवर्तला ॥ ७१ ॥ यादवगर्जतीमहावीर ॥ सिंहनादक
रितीथोर ॥ भीमकीआनंदेंनिर्भर ॥ वरिलावरश्रीकृष्ण ॥ ७२ ॥
हर्षेंनाचतनारद ॥ आतांहोईलद्वंद्वयुद्ध ॥ यादवआणिमागध ॥
झोडधरणींभिडतील ॥ ७३ ॥ रथलोटतीरथावरी ॥ कुंजरआदळ

तीकुंजरीं ॥ स्वारआदळतीअश्वांवरी ॥ महावीरींमहावीर ॥ ७४ ॥ शस्त्रसुटतीलगाढीं ॥ वीरभिडतीलकडोविकडी ॥ डोळेभरीपाहीन गोडी ॥ शेंडीतडाडीनारदाची ॥ ७५ ॥ थोरहरिखेंपिटिलीटाळी ॥ साल्यामेहुण्यांहोईलकळी ॥ कृष्णकरीलरांडोळी ॥ तेमीन व्हाळीपाहीन ॥ ७६ ॥ एकाजनार्दनम्हणे ॥ रुक्मिणीहरणकेलेंकृष्णें ॥ वीरखवळतीलधांवणें ॥ युद्धसत्राणेंहोईल ॥ ७७ ॥ रसाळ कथाआहेपुढां ॥ रणींनाचेलरणधेंडा ॥ वोवाळणीबाणप्रचंडा ॥ परस्परेंपडतील ॥ ७८ ॥ ऐकायुद्धाचीकुसरी ॥ युद्धमांडिलेंकवणेपरी ॥ क्रोधेंझुजताझुंझारी ॥ मुक्तीचारीकामाच्या ॥ ७९ ॥ इतिश्री मद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेभीमकीहरणंनामसप्तमःप्रसंगः ॥ ७ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥

## प्रसंग ८ वा.



श्रीकृष्णायनमः ॥ ॥ ऐकायुद्धाचीकुसरी ॥ युद्धमांडिलेंकवणेपरी ॥ क्रोधेंझुंजतीझुंजारी ॥ मुक्तीचारीकामाचिया ॥ १ ॥ रिघोनियांजंबुकांभीतरीं ॥ आपुलाभागनेतोकेसरी ॥ तैसीवेढिलीमहावीरीं ॥ नेलीनोवरीश्रीकृष्णें ॥ २ ॥ सांगातिणीजिवेंभावें ॥ जडल्याहोत्याभीमकीसवें ॥ त्यात्यजूनिकृष्णदेवें ॥ नेलीनिजभावेंभीमकी ॥ ३ ॥ आंदण्याअविद्येच्यादासी ॥ मोहोममतेच्यासखियांसी ॥ सांडूनिनेलेंभीमकीसी ॥ उकसाबुकसींस्फुंदती ॥ ४ ॥ सुडावीतनेलीवधू ॥ लाजिन्नलाअभिमानियाबंधू ॥ अपूर्णकामेंउपजेक्रोधू ॥ तैसामागधूधांविन्नला ॥ ५ ॥ कोणीनेलेंगेनोवरीसी ॥ येरीम्हणतीलाजहानींतुम्हांसी ॥ राखोंआलेतिभीमकीसी ॥ शेखीआम्हांसीपूसतां ॥ ६ ॥ जळोतुमचेंदादुलपण ॥ नपूंसकाहूनिहीन ॥ वृथागेलेंआंगवण ॥ कायवदनदावितां ॥ ७ ॥ श्लोकः ॥ स्यंदनेगरुडकेतुमंडिते



कुट्टिमेचतनयाधिरोपिता ॥ केनचिन्नवतमालकांतिवच्छयामलेनपुरुषेणनीयते ॥ १ ॥ टीका ॥ गरुडध्वजझळकेज्यासी ॥ तोडरगर्जेचरणांसी ॥ विजुखिळिलीमेखलेसी ॥ तैसाकांसेसीपीतांबर ॥ ८ ॥ टिळकरेखिलापिंवळा ॥ मुकुटकुंडलेंवनमाळा ॥ डोळससुंदरघनसांवळा ॥ भीमकबाळातेणेंनेली ॥ ९ ॥ मागधम्हणेगेलीवाढीव ॥ धैर्यगांभीर्यवैभव ॥ यशकीर्तीचीराणीव ॥ नेलीसर्वयादववीरीं ॥ १० ॥ धिक्धिक्पणझालेंजीवाचें ॥ आतांयेथोनिपरतणेंकैचें ॥ गोवळींयशनेलेंआमुचें ॥ म्हणोनीकवचेंबांधिलीं ॥ ११ ॥ पाठीचीहिरोनीनेलीभाज ॥ याहूनथोरकोणतीलाज ॥ करणेंनिर्वाणीचेंझुंज ॥ म्हणोनिपैजघेतसे ॥ १२ ॥ वीरवळंघलेअश्वांवरी ॥ नाचतीतिहींपायांवरी ॥ होहोमामाजीजीकारीं ॥ दावास्वारींदाविला ॥ १३ ॥ पुढेंपायांचेमोगर ॥ आढाउचालतीगंभीर ॥ शेलेसंबलेकोतकर ॥

धनुर्धरपायांचे ॥ १४ ॥ रथजोडिलेएकवट ॥ वरीवीरचढलेउद्भट ॥ घडघडलेचक्रवाट ॥ रजेंअंबरकोंदलें ॥ १५ ॥ घोडियाबाणलीमोहाळी ॥ कंगळटोपराघावळी ॥ पाखराझळकतीतेजाळी ॥ आरसेतळींलाविले ॥ १६ ॥ दोहींबाहींकुंजरथाट ॥ मदगलितगजघंट ॥ दांतींलोहबंधतिखट ॥ वीरउद्भटवळंघले ॥ १७ ॥ एकचढलेउंटांवरी ॥ एकचढलेअश्वांवरी ॥ एकचढलेखेचरीं ॥ वीरभारीगर्जती ॥ १८ ॥ शस्त्रेंझळकुतातीकैसीं ॥ प्रळयकाळींचीविजूजैशी ॥ मेघगर्जतीआकाशीं ॥ तैसागजांसींगजगर्जू ॥ १९ ॥ आम्हींप्रचंडधनुर्वाडे ॥ रणकर्कशरणींगाढे ॥ नोवरीघेऊनआम्हांपुढें ॥ कोणीकडेपळतील ॥ २० ॥ निशाणेंत्राहाटिल्याभेरी ॥ खाखाइल्यारणमोहरी ॥ सिंहनादकेलावीरीं ॥ उपराउपरीधांविन्नले ॥ २१ ॥ शस्त्रास्त्रींसन्नद्धदळ ॥ मीनलेमहावीरसकळ ॥ धांविन्नलेउतावेळ ॥



यादवदळठाकलें ॥ २२ ॥ अवघेमिळोनदीधलीहांक ॥ कृष्णादाखवींपांमुख ॥ भीमकीपावलोंहेंसुख ॥ झणीदेखमानिसो ॥ २३ ॥ सांडींसांडींभीमकीचासंग ॥ अबद्धींबांधिजेशीलचांग ॥ आलाकोपिष्ठांचालाग ॥ पडेलपांगदुजयाचा ॥ २४ ॥ एकलाएकटाहोतासी ॥ तैंतूंकोणानाटोपसी ॥ स्त्रीलोभेंअडकलासी ॥ सांपडलासीवैरिया ॥ २५ ॥ तूंहृदयशून्यअविवेकी ॥ दुजियातेंनमानिसीशेखी ॥ तुजजेमीनलेविवेकी ॥ तेत्वांवृत्तिशून्यपैंकेले ॥ २६ ॥ अविचारीतूंएकाएकीं ॥ चोरिलीपरात्परभीमकी ॥ तेतंवनजिरेइहलोकीं ॥ वीरींकामुकेंवाहिलीं ॥ २७ ॥ अविद्याचोरिलीचंद्रावळी ॥ विद्याराधातेगोवळी ॥ तैसीनेऊंपाहसीभीमकबाळी ॥ असुरींफळीमांडिली ॥ २८ ॥ नकरितांरेयावागाढा ॥ सवेगींजाऊंपाहसीपुढां ॥ पळों

नकोरेपरतभेडा ॥ होईंगाढावीरवृत्ती ॥ २९ ॥ गौगोरसमंथनकरि
तां ॥ चोरिशीसारांशनवनीता ॥ तैसीचनेऊंपाहसीराजदुहिता ॥
बहुतांझुंझतांतेंनये ॥ ३ ॥ यापरीतूंगोवळाजाण ॥ आतांकरींशहा
णपण ॥ भीमकीसांडूनवांचवींप्राण ॥ जीवदानतुजदिधलें ॥ ३१ ॥
जैसेअहंकाराचेदुर्ग ॥ तैसेंआलेंचतुरंग ॥ भीतरींवीरअनेक ॥ काम
क्रोधादिखवळले ॥३२॥ महामोहाचेमेहुडे ॥ तैसेंसैन्यआलेंपुढें ॥
कृष्णनिजबोधाचेनिजगडे ॥ यादवगाढेपरतले ॥ ३३ ॥ भीमकी
ऐशानेणोंकिती ॥ कृष्णेंवरिल्याअनंतशक्ती ॥ तुम्हांमशकांचापाड
किती ॥ वेगेंदळपतीपरतला ॥ ३४ ॥ पळतांजन्मगेलेंतुमचें ॥ बो
लबोलतांनाकउंचें ॥ आतांचीजाणवेलसाचें ॥ बहुबोलाचेंफळकाय
॥ ३५ ॥ सत्रावेळंपेळालेती ॥ निर्लज्जमागुतीआलेती ॥ रणीं



तुम्हांलावीनख्याती ॥ धनुष्येंहातींवाहिलीं ॥ ३६ ॥ दोहींसैन्याझा
लीभेटी ॥ वोढिल्याधनुष्याच्यामुष्टी ॥ होतबाणांचीपैंवृष्टी ॥ कूर्म
पृष्ठीकांपतसे ॥ ३७ ॥ तडकफुटलाएकसरें ॥ भिंडीमाळांचेपा
गोरे ॥ वीरगर्जतीहुंकारें ॥ रणतुरेंलागलीं ॥ ३८ ॥ पायींचेलोट
लेपायींच्यावरी ॥ अश्वस्वारस्वारांवरी ॥ वीरअडखळलेवीरीं ॥ पर
स्परेंहाणिती ॥ ३९ ॥ गजआदळलेगजासी ॥ महावंतमहावंतां
सी ॥ शस्त्रेंओढवितीशस्त्रेंसीं ॥ घायींघायासींनिवारण ॥ ४० ॥ वो
डणेंआदळतीवोडणा ॥ बाणसुटतीसणसणा ॥ खड्गेंवाजतीखणख
णा ॥ काळकंदनामांडिलें ॥ ४१ ॥ धीरवीराहेसाहे ॥ मागेंनठेवि
तीपाय ॥ माथांवाजतीघाय ॥ रुधिरवाहेभडभडां ॥ ४२ ॥ शस्त्रेंतु
टतीहातींचीं ॥ कव्यारकाढितीम्यानाची ॥ उदरेंफोडितीगजाचीं ॥

वीरपायांचेचवताळती ॥ ४३ ॥ वोडणउचलोनियांठायीं ॥ वारुतो
डिलेपायीं ॥ वीरपाडोनियांभुई ॥ आढाउपायींभीडली ॥ ४४ ॥ भा
तडीचेसरलेशर ॥ शरधनुष्यदंडींमहावीर ॥ झोडूनपाडितीअपार ॥
घोरांदरमांडिलें ॥ ४५ ॥ लाथाहाणोनियांगजातें ॥ झोडधरणीमहा
वंतांतें ॥ तळींआणोनियांत्यांतें ॥ घार्यींआंतडींकाढिती ॥ ४६ ॥
घार्यींपाडितीगजांतें ॥ उपडूनिघेतीगजदंतांतें ॥ धांवोनिहाणितीर
थांतें ॥ एकेचिघार्यींशतचूर्ण ॥ ४७ ॥ घार्यींपातलेमहावीर ॥ वोढि
तीअंत्रमाळांचेभार ॥ तरीधांवतीसमोर ॥ थोरथोरांपाडिती ॥ ४८ ॥
कृष्णाबळेंयादवगाढे ॥ रणींलोटलियापुढें ॥ देखोनिमागधधनु
र्वाडे ॥ कोपेंवेंगाडेउठावले ॥ ४९ ॥ हांकदिधलीमहावीरीं ॥ बाण
सुटलेएकसरीं ॥ यादवसैन्याचामहागिरी ॥ शरधारींझांकोळला



॥ ५० ॥ आमुचेबाणांचेंलाघव ॥ आजिफावलेतीयादव ॥ धांवापा
वाचलासर्व ॥ आलेगौरवूंआम्हांसी ७ ५१ ॥ देखोनिवैरियांचावरव
ळा ॥ कांपिन्नलीभीमकबाळा ॥ नाशहोईलदोहींकुळां ॥ बोलक
पाळालागेल ॥ ५२ ॥ दीरभावेपडतीलरणीं ॥ सासुऱ्याहोईलटे
हणीं ॥ कैंचीआणिलीहेवैरिणी ॥ धडकोणीनबोलती ॥ ५३ ॥ सखे
बंधूपडतीलरणीं ॥ दुःखेंफुटेलजननी ॥ माहेरतुटेलयेथुनी ॥ मुखकै
सेनीदाखवावें ॥ ५४ ॥ कृष्णपावलियापुढें ॥ कैसेंमांडलेंसांकडें ॥
कठिणवोढलेंदोहींकडे ॥ कपालकुडेंमाझेंची ॥ ५५ ॥ थोरवोढवलें
दुस्तर ॥ तुटलेंसासुरमाहेर ॥ कृष्णावेगळानदिसेथार ॥ पाहिलेंव
ऋहरीचें ॥ ५६ ॥ देखोनिहांसिन्नलावनमाळी ॥ भिऊंनकोवोवेल्हा
ळी ॥ यादवउठावलेमहाबळी ॥ रणकंदळीकरितील ॥ ५७ ॥ तुझे

दीरभावेरणीं ॥ शत्रुभेदितीलबाणीं ॥ धडमुंडांकितधरणी ॥ अर्धक्ष
णींकरतील ॥५८ ॥ यादवदळींथोरथोर ॥ परतलेजीवमहावीर ॥ प
रिसानांवेंसादर ॥ सविस्तरसांगेन ॥ ५९ ॥ वीरांमाजींमुख्यहलायु
ध ॥ अक्रूरकृतवर्माआणिगद ॥ सारणसात्विकसन्नद्ध ॥ चक्रदेवम
हावीर ॥ ६० ॥ सात्यकीआणिदंतश्वफल्क ॥ महाबाहूवीरकंक ॥
इतुकेमुख्यकारणींदेख ॥ वीरअनेकयदुभारीं ॥ ६१ ॥ हरिवंशींयादव
वीर ॥ सांगितेलजीअपार ॥ तितुकानकरवेविस्तार ॥ ग्रंथअपारवा
ढेल ॥ ६२ ॥ दोन्हींपंचकेंआणिकएक ॥ इतुकेयेथेंवीरनायक ॥ ये
रयेरांसींसाह्यदेख ॥ मुख्यचालकबळिभद्र ॥ ६३ ॥ अवघियांश्रीकृ
ष्णाचेंबळ ॥कृष्णबळेंअतिप्रबळ ॥ यादवउठावलेसकळ ॥ सन्नद्धद
ळकरूनियां ॥ ६४ ॥ परदळींअतिदारुण ॥ वीरआलेकोणकोण ॥



जयांसीगाढीआंगवण ॥ तेराजेजाणसांगिजेती ॥ ६५ ॥ जरेपासुनी
जन्मलामोहो ॥ तैसाजरासंधपहाहो ॥ वेगेंउठावलामहाबाहो ॥
सैन्यसमुदायलोटला ॥ ६६ ॥ जरासंधासवेंप्रबळ ॥ राजेचाललेस
कळ ॥ कोणकोणआलेभूपाळ ॥ नांवेंसकळपरियेसा ॥ ६७ ॥
शाल्वपौंड्रकविदूरथ ॥ बळेंप्रबळवक्रदंत ॥ यावीरांचायावाअद्भुत ॥
वेगनधरितपावले ॥ ६८ ॥ गवेषणअंगवंग ॥ कौशिककारूषकलिं
ग ॥ हेहीराजेजीअनेग ॥ बळेंचांगउठावले ॥ ६९ ॥ सकळांमु
ख्यजरासंध ॥ सबळबळेंसीमागध ॥ अवघेझालेसन्नद्ध ॥ दारुणयुद्ध
मांडिलें ॥ ७० ॥ चढिलाबळिभद्रासीरणमद ॥ देखोनिबोलिलावी
रगद ॥ वीर्यशौर्यअतिविनोद ॥ गोत्रसंबंधयुद्धाचा ॥ ७१ ॥ दैवें
जोडिलेंयुद्धसंपत्तीसी ॥ एकलाचीतूंनेऊंपाहसी ॥ स्वार्थीऐसाकैसा

होसी ॥ वांटाआम्हांसीपाहिजे ॥ ७२ ॥ वीरविभागतवप्रसिद्ध ॥ माझावांटाजरासंधू ॥ सात्यकीआमुचाधाकुटाबंधू ॥ वक्रदंतत्यासी दिधला ॥ ७३ ॥ पौंड्रकदिधलाकृतवर्म्यासी ॥ विदूरथदिधलाअ क्रूरासी ॥ येरअवघेदिधलेतुम्हांसी ॥ गोत्रजांसीसमजाविंजे ॥ ७४॥ कोणींविकल्पधरीलचित्तीं ॥ संबंधनाहींअर्थाअर्थी ॥ वाटाकेलाअ तिनिगुती ॥ वीरवृत्तींनांदावें ॥ ७५ ॥ दायादएकादेआपुले ॥ र णींदेखालखंगलेभंगले ॥ त्यांसीपाहिजेसांभाळिलें ॥ धनजोडिलें त्यानांव ॥ ७६ ॥ हांसूंआलेंबळिभद्रासी ॥ टाळीपिटिलीटाळी सीं ॥ रणचतुरतूंयोद्धाहोसी ॥ म्हणोनिपोटासींधरियेला ॥ ७७ ॥ एकाजनार्दनींसन्नद्ध ॥ मीनलेगदहलायुध ॥ कोपेंखवळलाजरासंध ॥ दारुणयुद्धमांडिलें ॥ ७८ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधे हरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेयुद्धप्रारंभोनामअष्टमःप्रसंगः॥८॥

## प्रसंग. ९ वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ येऊनीजरासंधाप्रती ॥ वीरप्रतिज्ञाबोलती ॥ धनुष्येंवाहिलींहातीं ॥ रणींव्यातीलावूंआम्ही ॥ १ ॥ आमुच्या बाणांचोप्रौढो ॥ केवींसाहतीरुबापुडीं ॥ नेणतीयुद्धाचीपरवडी ॥ रणनिरवडीमाराची ॥ २ ॥ यादवांचेंबळतेंकिती ॥ आम्हांसन्मुख केवींराहती ॥ नोवरीसांडूनियांपळती ॥ महारथीलोटले ॥ ३ ॥ आचांगळीअधिकशब्द ॥ ऐकूनउठलावीरगद ॥ कोपेंखवळलाह लायुध ॥ रणमदेंचालिला ॥ ४ ॥ रागेंपेटलाप्रबळ ॥ घेतलेंनागर मुसळ ॥ नेत्रींहूनीनिघतीज्वाळ ॥ परदळखवळलें ॥ ५ ॥ सैन्य आटीहलायुध ॥ देखोनिचालिलाजरासंध ॥ त्यावरीउठलावीर गद ॥ द्वंद्वयुद्धमांडिलें ॥ ६ ॥ महावीरबळिभद्र ॥ म्हणोनीचालि लादंतवक्र ॥ त्यावरिउठावलासात्यकिवीर ॥ येरयेरांपडखळले ॥ ७ ॥ दोघांझालीदृष्टादृष्टी ॥ वडघडिल्याचक्रवाटी ॥ वोढल्याधनुष्यांच्या



मुष्टी ॥ दोघेहट्टीमहावीर ॥ ८ ॥ रागेंपौंड्रकपातला ॥ त्यावरीकृ तवर्मालोटला ॥ रथासीरथतगटला ॥ गुणसुटलाधनुष्याचा ॥ ९ ॥ बाणवोढूनियांवोढी ॥ कृतवर्मासवेगसोडी ॥ पौंड्रकाचाध्वजतो डी ॥ पताकापाडीमहीतळीं ॥ १० ॥ ध्वजतोडिलादेखोनी ॥ वेगें विंधिलासहाबाणीं ॥ हातींचेंधनुष्यतोडूनी ॥ पाडिलाधरणींकृतव र्मा ॥ ११ ॥ कृतवर्मावीरअंगें ॥ रथावरीचढलावेगें ॥ धनुष्यवाहू नियांरागें ॥ बाणअनेकवर्षला ॥ १२ ॥ पौंड्रकबाणांतेंताडित ॥ बाणामागेंबाणसोडित ॥ लक्ष्यलक्षूनीभेदित ॥ वीरविख्यातकृतव र्मा ॥ १३ ॥ हातींघेऊनतीनबाण ॥ धगधगितअतिदारुण ॥ पौं ड्रकातुझाघेईनप्राण ॥ वेगींविंदानपाहेंमाझें ॥ १४ ॥ पौंड्रकनि वारणकरी ॥ परीतेअनिवारभारी ॥ एकसारथियातेंमारी ॥ दोनउ दरींआदळले ॥ १५ ॥ बाणभेदिलेसपिच्छेंसीं ॥ पौंड्रकपाडिलाध

रणीसीं ॥ मूर्च्छेनादाटलीत्याकैसी ॥ देहभावासीविसरला ॥ १६ ॥
पौंड्रकपाडिलामूर्छित ॥ तंवधांविन्नलाविदूरथ ॥ त्यातेंअक्रूरत्वरि
त ॥ पाचारितरणभूमीं ॥ १७ ॥ अक्रूरवीरअतिगाढा ॥ रथआड
वारथापुढां ॥ घालोंउठिलागावेढा ॥ बळेंमेंढावाहिला ॥ १८ ॥
तुझेंनांवतंवअक्रूर ॥ दारुणयोद्धानव्हेसिक्रूर ॥ तुजकोणगणीलवीर ॥
रणींधीरनधरवे ॥ १९ ॥ जयासीनाहींवीरवृत्ती ॥ तयासीअरक्रूगा
म्हणती ॥ तुजसींयुद्धतेंकिती ॥ बाणशितींलाविला ॥ २० ॥ तुझि
याहृदयाचीक्रूरता ॥ समूळबाणेंछेदिनआतां ॥ पाहेंमाझीअक्रूरता ॥
मदगर्विताझाडीन ॥ २१ ॥ सुटलेदोघांचेहीबाण ॥ अतिझणत्कारें
वाजतीगुण ॥ बाणींगगनझालेंपूर्ण ॥ सूर्यकिरणेंझाकुळ्ती ॥ २२ ॥
मेघांमाजीविजुतळपती ॥ तैशाभाळींझळकताती ॥ बाणबाणातेंआ
दळ्ती ॥ तिडक्याउठतीअंतराळीं ॥ २३ ॥ षड्विकारसाहीबाण ॥



अक्रूरावरघालीदारुण ॥ येरेंनिर्विकारलक्षसाधून ॥ बाणींबाणनि
वारिले ॥ २४ ॥ तिखटउर्मीचियाभाली ॥ सवेंचिविदूरथघाली ॥
घायेंकरूनजीवमूळीं ॥ गर्जूनबोलींविंधीत ॥ २५ ॥ काढिलानिज
बोधाचाकुऱ्हाडा ॥ गुणींलावुनीलोटलापुढां ॥ भालीसींहतताडिला
मेंढा ॥ गाढाधनुर्वाडाअक्रूर ॥ २६ ॥ घेऊनसक्रोधाचाभाला ॥
रथावरूनतोउडाला ॥ निश्चळनिजशांतींविंधला ॥ भालातोडिला
माझारी ॥ २७ ॥ गुप्तहोतीवासनासुरी ॥ हाणोंधांविन्नलाउरावरी ॥
स्वानुभवाचीभालीखरी ॥ वीरेंनिर्धारींविंधिली ॥ २८ ॥ भाळींआ
दळ्लीसत्राणें ॥ विदूरथझणाणिलातेणें ॥ सुरीउडविलीकोणेंमानें ॥
गेलीगगनादिसेना ॥ २९ ॥ बाणअव्यक्तकाढिला ॥ गुणींअवगुणा
तेंजोडिला ॥ अक्रूरेंकानाडींओढिला ॥ उडविलाहोविदूरथ ॥ ३० ॥
बापअक्रूरवीरराणा ॥ कोणीसोडिलेंनेणेबाणा ॥ रथासकटउडविला

गगना ॥ रणप्रदक्षिणाकरविली ॥ ३१ ॥ बाणभेदिलेजिव्हारीं ॥
विदूरथपाडिलाधरणीवरी ॥ डोळांलागलीअर्धचंद्री ॥ जेवींखेचरी
योगियां ॥ ३२ ॥ श्वफल्कसात्यकीचक्रदेव ॥ कंकसारणादिकयाद
व ॥ यांवरीउठावलेराजेसर्व ॥ अंगवंगादिकलिंग ॥ ३३ ॥ बाण
सणसणासुटती ॥ खड्गेंखणखणावाजती ॥ रथरथांसीआदळती ॥
वीरगर्जतीसिंहनादें ॥ ३४ ॥ रणींउडविलालोहधुरोळा ॥ तेणेंचा
लोंनशकेवारा ॥ रणमदचढलाअसेवीरां ॥ येरयेरांहांकिती ॥ ३५ ॥
बाणबाणांतेंआदळती ॥ धार्यीठिणकियाउसळती ॥ तेणेंपिसारेपेटघे
ती ॥ बाणजळतीअंतराळीं ॥ ३६ ॥ कारूषेंघेऊनिबाणनव ॥ वेगीं
विंधिलाचक्रदेव ॥ बाणासरसीघेऊनिधांव ॥ रथावरुनीआसुडिला
॥ ३७ ॥ चक्रदेवेंलवडसवडी ॥ कारुषिकावरीघातलीउडी ॥ येरूसां



पडल रथबुडीं ॥ बुद्धीगाढीतेणेंकेली ॥३८॥ अंगचुकवूनवेगेंसीं ॥
चक्रदेवधरिलाकेशीं ॥ थडकहाणोनउराशीं ॥ कारूषिकासीपाडिलें
॥ ३९ ॥ गजारूढवीरविख्यात ॥ अंगरायेंपेलिलाहस्त ॥ चक्रदे
वाचामोडिलारथ ॥ वीराविरथकरीतसे ॥ ४० ॥ अंगयोद्धामहाब
ळी ॥ रथरगडीगजातळीं ॥ यादवसैनिकमंडळीं ॥ रणींरांगोळीक
रूंआला ॥ ४१ ॥ यादवांमाजीकंकबळी ॥ रागेंकरीतउठिलाहो
ळी ॥ अंगासीहाणोनीकपाळीं ॥ गजासहितमारिला ॥ ४२ ॥
कलिंगसैन्यावरीदेख ॥ रागेंउठिलासात्यक ॥ वीरमारिलेअनेक ॥
रणींसैनिकपाडिले ॥ ४३ ॥ कोपआलाकलिंगासी ॥ सात्यकी
विंधिलाबाणेंसीं ॥ एकाचिबाणेंतोडूनत्यासी ॥ कलिंगासीपाचारिलें
॥४४॥ गुणींलावूनिकुन्हाडा ॥ मुकुटपाडूनितोडिलामेंढा ॥ ध
नुष्यघेऊनिउठावेगाढा ॥ कलिंगगाढाकोपला ॥ ४५ ॥ रथविंधि

लामकरतोंडीं ॥ सर्वेचिदोन्हीचाकेंफोडी ॥ पडलीसात्यकीचीसुर
कुंडी ॥ बाणवितंडीविंधिला ॥ ४६ ॥ सात्यकीवीरजगजेठी ॥
पडतपडतसर्वेचिउठी ॥ गदाघेऊनियांमुष्टी ॥ कलिंगदृष्टींसूदलां
॥ ४७ ॥ सव्यअपसव्यभोंवंडीगदा ॥ नधरतपातलातोयोद्धा ॥
कलिंगेंतोडिलीतेगदा ॥ सात्यकीक्रोधाचढिन्नला ॥ ४८ ॥ घेऊ
निरथाचापैंआंख ॥ वेगेंधाविन्नलासन्मुख ॥ कोपेंहाणोंआलासात्य
क ॥ येरेंमस्तकचुकविला ॥ ४९ ॥ रथाखालींघातलीउडी ॥ आंग
चुकविलेंरथाबुडीं ॥ कलिंगाचारथमोडी ॥ चारीघोडींमारिलीं
॥ ५० ॥ वंगराजारणप्रवीण ॥ कोपेंचालिलाघेऊनिबाण ॥ त्याव
रीउठावलासारण ॥ युद्धदारुणतेथेंझालें ॥ ५१ ॥ भोंवताबाणांचा
वळसा ॥ सैन्यपाडिलेंधारसा ॥ बाणभेदिलेसपिच्छा ॥ वंगत्रा
सापावला ॥ ५२ ॥ सारणेंथोरकेलामारु ॥ सारथीआणिमारि



लेवारु ॥ बाणींभेदिलेरहंवरु ॥ आणिदळभारुझोडिला ॥ ५३ ॥
विरथकेलावंगराजा ॥ सर्वेचिचढेपट्टगजा ॥ धनुष्यवाहोनियांवो
जा ॥ बाणपैजाघेतल्या ॥ ५४ ॥ बाणसोडिलेसारणावरी ॥ सार
णबाणांतेंनिवारी ॥ गजेंरथकेलाचुरी ॥ दांतउरींलाविले ॥ ५५ ॥
रथाखालींघातलीउडी ॥ गजधरिलाशुंडादंडीं ॥ सारणसोंडेतेंमुरडी ॥
गजाबुडींनिघाला ॥ ५६ ॥ गजमारावयाएकसरें ॥ सारणग
जातळींफिरे ॥ वंगवर्षताहेशस्त्रें ॥ सारणबाहेरनिघोनेदी ॥ ५७ ॥
सारणकोंडिलामहावीर ॥ यादवदळींहाहाकार ॥ ऐकोनपातलाब
ळिभद्र ॥ वृक्षथोरउपडिला ॥ ५८ ॥ रहेंसाहेंम्हणेवंगातें ॥ तेणेंविं
धिलाबाणसातें ॥ मुसळघेऊनडावेहातें ॥ त्याबाणातेंनिवारिलें
॥ ५९ ॥ दक्षिणहातींहोतावृक्ष ॥ एकेचिघायींकपाळमोक्ष ॥ गज
निमालानिःशेषदेख ॥ अधोमुखपडियेला ॥ ६० ॥ आडवाधांविन्न

लाकेशिक ॥ राजेउठावलेमुख्य ॥ झालाबळिभद्रासन्मुख ॥ दोघेदे
खखवळले॥ ६१ ॥ केशिकावरीहलायुध ॥ मारापडिलासुबद्ध ॥
येरीकडेराजेसन्नद्ध ॥ यादवांवरीउठावले ॥ ६२ ॥ केशिकराजाअ
तुर्बळी ॥ रामेंमारिलानिजहलीं ॥ गवेषणराजानिजकल्लोलीं ॥
घेईलसमफळीयादवासीं ॥ ६३ ॥ तेव्हांराममाजवीलरणनदी ॥
तेथेंचहूंपुरुषार्थांमोक्षसिद्धी ॥ कृष्णदृष्टीचियाप्रबोधीं ॥ सायुज्यपदीं
निजयोद्धे ॥६४॥ श्रीकृष्णाचियादृष्टीपुढें ॥ रणायेतांसायुज्यचढे ॥
निधडियावीरांभाग्यचोखडें ॥ सायुज्यरोकडेंसाधिती ॥ ६५ ॥
द्वंद्वयुद्धअतितुंबळ ॥ रणींमाजेलरणकल्लोळ ॥ एकाजनार्दनींरसाळ ॥
कथाकलिमलनाशिनी ॥ ६६ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदश
मस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेनवमःप्रसंगः ॥ ९ ॥

## प्रसंग १० वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ राजेचालिलेमुगुटांचे ॥ थोरबळगवेषणाचें ॥ से
न्यपातलेंमागधाचें ॥ युद्धत्याचेंदारुण ॥ १ ॥ वेगींधनुष्यींवाहिला गु
ण ॥ शितींलावूनियांबाण ॥ शस्त्रेंझळकतीदारुण ॥ रणकंदनकरूंआले
॥२॥ राजेचालिलेप्रबळ ॥ यादवउठावलेसकळ ॥ दुमदुमलींदोन्हींद
ळें ॥ एकमेळेंमिसळले ॥३ ॥ गगनकोंदलेंतिहींबाणीं ॥ तळींखळबळ
लीधरणी ॥ मागेंपायनठेवितीकोणी ॥ वीररणींखवळले ॥४॥ वीरवो
रांतेंहाणित ॥ लोहधुरोळाउसळत ॥ वाऱ्यावाटनचलेतेथ ॥ वीरअद्भुत
मातले ॥ ५ ॥ शस्त्रेंसहिततोडितीकर ॥ मुगुटेंसहितपाडितीशिर ॥ ग
जांसहितमारितीवीर ॥ सपिच्छतीरभेदिले ॥६॥चरणतोडिलेगजांचे ॥
राजेपाडिलेब्रीदांचे ॥ खुरछेदिलेअश्वांचे ॥ अंकरथांचेभेदिले ॥ ७॥
राजेनिवटिलेअनेक॥त्यांवरीउठावलाश्वफल्क ॥बाणींत्रासूनियांदेख ॥
एकेंएकखिळियेले ॥८॥ वीरभिडिन्नलेपडिपाडें ॥ यादवांचेंबळगाढें ॥



गवेषणचालिलापुढें ॥ गुणींकुऱ्हाडेलाविले ॥९॥ श्वफल्कविंधिलापां
चबाणीं ॥ रथछेदूनपाडिलाधरणीं ॥ कंकसात्यकीहेदोन्ही ॥ वीसबा
णींविंधिले ॥ १० ॥ बाणआनिवारनिर्व्यंग ॥ भेदिलेंवीरांचेंअष्टांग ॥
गवेषणयोद्धाचांग ॥ नकळेपांगदुजयाचा ॥११॥ चक्रदेवचालिलारा
गें ॥ एकेबाणेंविंधिलावेगें ॥ रथासहितघातलामागें ॥ रणभूमीसांड
विली ॥१२॥ देखोनिचालिलाअतिदंत ॥ कोपेंखवळलाअद्भुत ॥ दहा
वीसपांचसात ॥ बाणशतवरूषला ॥१३ ॥ बाणेंनिवारिलेबाण ॥ हां
सिन्नलागवेषण ॥ येरकोपलेदारुण ॥ आठबाणसोडिले ॥१४॥ दारु
णबाणआलेआठ ॥ अनिवारअतिउद्भट ॥ रथसारथीकेलापीठ ॥ शि
रींचामुगुटपाडिला॥१५॥एकखडतरलाबाण ॥ गगनागेलागवेषण ॥
क्रमूनियांग्रहगण ॥ ध्रुवमंडळींउडविला ॥१६॥ घायासरसीआलीभवं
डी ॥ पडतपडतआवरीमुरकुंडी ॥ रणांगणींघातलीउडी ॥ मूर्च्छागा

ढीसांवरिली ॥ १७ ॥ गवेषणआणिकेरथा ॥ चढोनिपातलाअवचि
ता ॥ पाचारूनअतिदंता ॥ होयविंधितासाहाबाणीं ॥१८॥ बाणसुट
लेकडाडी ॥ पडलीडोळियांझांपडी ॥ काढोंविसरलावोढी ॥ थोरहडब
डीअतिदंता ॥१९॥ दोनभेदलेभुजांवरी ॥ एकउरीं एकशिरीं ॥ दोनीरु
तलेदोहींकरीं ॥ धरणीवरीपाडिला ॥२०॥ घायेंलोळविलामहाबळी ॥
अधोमुखमहीतळीं ॥ झोंटीसुटलीमोकळी॥ भातेतळींरिचविले॥२१॥
हांकदेउनीगवेषण ॥ रणांगणींउभाआपण॥त्यावरीचालिलासारण ॥
बाणदारुणघेउनी ॥२२॥ बाणविंधितचपळ॥ धनुष्यतोडिलेंतत्काळ ॥
दुजेंधनुष्यघेउताविळ ॥ तेंहीसबळतोडिलें ॥ २३ ॥ एकखडतरलाबा
ण ॥ तोहीकेलानिवारण ॥ बाणींबाणतोडिलेजाण ॥ हांकदेउनीउभा
असे ॥२४॥ तिजेधनुष्यावाहिलागुण ॥ तेंहीतोडिलेंविंधोनिबाण ॥
जेंजेंधनुष्यघेईगवेषण ॥ तेंतेंसारणतोडित ॥ २५ ॥ सारणेंथोर



केलीख्याती ॥ धनुष्यघेऊंनेदीहातीं ॥ देखोनकोपलाभूपती ॥ मेंढा
निगुतीवाहिला ॥२६॥ सारणेंविंधिलासारथी ॥ ध्वजस्तंभपाडिला
क्षितीं ॥ येरेंविंधिलाबाणेंसातीं ॥ दोहींहातींखोंचला ॥२७॥ सारण
विकळपाडिलारथीं ॥ वीरमूर्च्छितपाडिलेक्षितीं ॥ गवेषणेंलाविली
ख्याती ॥ भद्रजातीखवळला ॥२८॥ मगमिसळलादळभारीं ॥ करी
तअसेमहामारी ॥ वीरखिळिलेजेशरीं ॥ शरधारींवर्षतीते ॥ २९ ॥
येरीकडेकेशिकवीर ॥ वर्षतबाणांचामहापूर ॥ बाणींत्रासिलाबळिभ
द्र ॥ दळभारवेढिला ॥ ३० ॥ खड्गतोमरगदापरिघ ॥ वीरहाणितातीसं
संघ ॥ रामसाधकअतिचांग ॥ घायअंगालागोंनेदी ॥ ३१ ॥ हलभ
वंडीचहूंकडां ॥ वीरपाडिलेदडदडां ॥ नांगरेंकेलाजीववेडा ॥ केशिक
गाढाहांकिला ॥३२॥ बाणींविंधिलाप्रबळें ॥ तिखटसोडिलींशरजा
ळें ॥ बाणतोडोनीपाडिले ॥ निजबळेंलोटला ॥ ३३ ॥ नांगरउचलू

नियांवाडें ॥ नेटूनपायठेविलापुढें ॥ पायींचूरकेलींहाडें ॥ अशुद्धउडे आकाशीं ॥ ३४ ॥ सैन्यावरीलोटलादेखा ॥ ठायींपाडिलेंसेनानाय का ॥ धरितांनधरवेचितवका ॥ वीरांअनेकांमारिलें ॥३५॥ रथभूमी सीआफळी ॥ गजशुंडादंडींपिळी ॥ शिरेंखेळतीचेंडूफळी ॥ रणकं दोळीमांडिली ॥ ३६ ॥ धाकघेतलाझुंजारीं ॥ केशिकसैन्यपळा लेंदूरी ॥ बळिभद्रपेटलामहामारी ॥ युद्धवीरींमांडिलें ॥३७॥ जरासंध देखिलादुरी ॥ रामचढेरथावरी ॥ रथपेलिलाझडकरी ॥ उपराउप रीहांकिला ॥ ३८ ॥ वेगींधनुष्याचढविलागुण ॥ रामेंकाढिलेनिर्वा णबाण ॥ गदेंघातलीआपुलीआण ॥ रणविंदानपाहेंमाझें ॥ ३९ ॥ धीरधरींअर्धघडी ॥ पाहेंयुद्धाचीनिरवडी ॥ जरासंधातेंबाणप्रौढी ॥ गर्वझाडीकरीन ॥४०॥ गदूनिजगडामहावीर ॥ योद्धारणरंगींचतु र ॥ बळिभद्रासीकेलास्थिर ॥ रहंवरथांबविला ॥ ४१ ॥ येरीकडेया



दवभारा ॥ गवेषणपेटलामारा॥बाणेंविंधिलेंमहावीरां ॥ मुख्यधनुर्ध रखेंचले ॥ ४२ ॥ विकळदेखोनिदळभार ॥ मागधवीरींकेलामार ॥ आटभविन्नलाजोरथोर ॥ हाहाकारउठिन्नला ॥ ४३॥ निजसैन्यासीम हावीवीर ॥ दुरोन देखेबळिभद्र॥ कोपेंखवळलाअतिदुर्धर ॥ रहंवरलो टिला ॥४४॥ परसैन्यदेखोनिदृष्टीं ॥ वेगेंचालिलाजगजेठी ॥ घड घडिल्याचक्रवाटी ॥ उठाउठींपातला ॥ ४५ ॥ देखोनिशत्रूचाखटा टोप ॥ बळिभद्रासीनधरवेकोप ॥ बाहुस्फुरणेंआलाकंप ॥ वेगेंसा टोपउठिन्नला ॥४६॥ रथाखालींघातलीउडी॥ शेषफडीदडपलीबुडीं॥ वराहाचीदाढतडाडी ॥ कूर्मेंगाढीपाठकेली ॥ ४७ ॥ वीरखिळू नियांबाणीं ॥ गवेषणगर्जेरणांगणीं ॥ आलाबळिभद्रावरीधांवोनी ॥ निर्वाणबाणींविंधित ॥४८॥ बाणविंधिलासबळ॥ येरेंपरजिलेंमुसळ॥ स धकबळिभद्रप्रबळ ॥ बाणजाळतोडिलें ॥ ४९ ॥ नांगरउचलू

नियांबळें ॥ नधरतपातलातयेवेळे ॥ रथसांडिलातत्काळें ॥ वेगेंपळे
गवेषण ॥ ५० ॥ सवेंचिपरतावयापाहात ॥ पायींघातलानांगरदांत ॥
गवेषणपाडिलातेथ ॥ भूमीदांतआदळले ॥ ५१ ॥ उठताझालात्वरि
त ॥ बळिभद्रेंदीधलीलाथ ॥ येरूअशुद्धातेंवमित ॥ पडिलामूर्च्छित
अचेतन ॥ ५२ ॥ सांडूनियांधनुष्यबाण ॥ सैनिकधाविन्नलाआपण ॥
रथींघालोनियांगवेषण ॥ घेऊनप्राणपळाला ॥ ५३ ॥ देखोनिबळिभ
द्राचेंबळ ॥ राजेचालिलेसकळ ॥ पुढेंकरूनियांगजदळ ॥ एकवेळलो
टले ॥ ५४ ॥ आलेंदेखोनिपरदळ । करीतहरुषाचागोंधळ ॥ झेलि
तनांगरमुसळ ॥ वेगेंसबळलोटला ॥ ५५ ॥ गजाहाणीतसेमुसळें ॥
घायींकिलकिलतीएकवेळे ॥ विदारिलींकुंभस्थळें ॥ गजकलेवरेंपा
डिलीं ॥ ५६ ॥ नांगरहाणोनिरथांवरी ॥ शतसहस्रांकरीचुरी ॥ प
ळतेगजापायींधरी ॥ आसडूनिमारीभूमीसी ॥ ५७ ॥ चपळचौता



ळतीघोडीं ॥ नांगरघालोनीत्यांतेंवोढी ॥ घायेंमुसळाचेनिपाडी ॥
वीरझोडीमांडिली ॥ ५८ ॥ वीरवरुषतातीशरां ॥ जैशामेघवर्षतीप
र्जन्यधारा ॥ रणींचालतांबळिभद्रा ॥ वीरथरथरांकांपती ॥ ५९ ॥
पायींचेरगडिलेपायीं ॥ अश्वगजपाडिलेभुई ॥ रथेंरथमोडिलेपाहीं ॥
सन्मुखघायींकोणराहे ॥ ६० ॥ पृथ्वीतेचिउखळजाण ॥ नांगरेंवीर
घालीवैरण ॥ मुसळघायेंकरीचूर्ण ॥ रणकंदनमांडिलें ॥ ६१ ॥ सा
त्यकीदंतवक्रयुद्ध ॥ गदेंगोविलाजरासंध ॥ मोकळापडिलाहलायु
ध ॥ वऱ्हाडीसुबुद्धकोंडावया ॥ ६२ ॥ वीरींघेतलारणकाहो ॥ दे
खोनिधांविन्नलाशाल्वो ॥ मिळोनिवीरांचासमुदावो ॥ महाबाहोख
वळला ॥ ६३ ॥ धांवतादेखोनिशाल्ववीर ॥ आडवाआलाअक्रूर ॥
राहेंसाहेंम्हणेस्थिर ॥ धरींधीरसंग्रामीं ॥ ६४ ॥ तंवबळिभद्रपातला
रागें ॥ अक्रूरातेंम्हणेउगें ॥ मजपाचारितांअंगें ॥ तूंकांसंगेंआलासी

॥ ६५ ॥ रणींझुंजारविकळजाय ॥ तरीदुजयानेंव्हावेंसाह्य ॥ शाल्व बापुडेंतेंकाय ॥ कौतुकपाहेंपैंमाझें ॥ ६६ ॥ मगचालिलाशाल्वाव री ॥ बळिभद्रेंवेढिलावीरीं ॥ बहुतउठिलेमहामारी ॥ शरधारींवर्षती ॥ ६७ ॥ बापबळिरामजगजेठी ॥ नांगरेंबाणकरीपिठी ॥ अंगाला गूंनेदीचिरटी ॥ शाल्वदृष्टींसूदला ॥ ६८ ॥ बाणींविंधिलाअमित ॥ रामबाणातेंनगणित ॥ वेगेंउसळलाअद्भुत ॥ आलानधरतआंगासीं ॥ ६९ ॥ रथतोडिलामकरतोंडी ॥ शाल्वेंवेगींघातलीउडी ॥ सांप डलातोरथाबुडीं ॥ वोढाकाढीनिष्ठला ॥ ७० ॥ रथआपटिलाभूमं डळीं ॥ वीरसांपडलारथातळीं ॥ घायेंकेलीरांगोळी ॥ निधापाता ळींऊठिला ॥ ७१ ॥ तेवेळींशाल्वेंचुकविलेंआंग ॥ घायासरिसाउ डालासवेग ॥ मागुताआवेशधरूनियांचांग ॥ रणींअव्यंगउभाअसे ॥ ७२ ॥ शाल्वघेऊनियांगदा ॥ हृदयींहाणितहलायुधा ॥ गगना



उसळेतोयोद्धा ॥ घायवसुधातळींगेला ॥ ७३ ॥ शाल्वरथींजंवचढे ॥ तंवमुसळवोपिलेंरोकडें ॥ घायेंउडतीअशुद्धांचेसडे ॥ मूर्छितपडेअव नीये ॥ ७४ ॥ मगमिसळलामागधांत ॥ घायेंशतसहस्त्रांमारित ॥ अशुद्धभडभडांवहात ॥ नांगरेंअंतपुरविला ॥ ७५ ॥ बळिभद्रेंकेली महामारी ॥ वीरझोडिलेनांगरीं ॥ तेथेंवीरवीरांतेंपरस्परीं ॥ ऐशियाप रीबोलती ॥ ७६ ॥ हतियारासींदुकाळपडला ॥ त्यांसींनांगरसांपड ला ॥ सैन्यनागरावयाआला ॥ वीरकाशियाकाढिती ॥ ७७ ॥ नां गरघालूनियांबुडीं ॥ थोरथोरउचलिल्यापेढी ॥ रथगजखुंटमोडी ॥ पालव्यातोडीवीरांच्या ॥ ७८ ॥ अतिरथीजेउद्भट ॥ समूळखुडिये लेखुंट ॥ बळिभद्रहाकुळंबट ॥ केलीचोखटरणभूमी ॥ ७९ ॥ महावीरां घालितांघावो ॥ अशुद्धेंडवरिलाबलदेवो ॥ तेणेंशोभतमहाबाहो ॥ रणभैरवडुल्लत ॥ ८० ॥ रणमदेंझालामत्त ॥ नांगरघेऊनियांनाचत ॥

वीरदेखोनियांधांवत ॥ पुरलाअंतसैन्याचा ॥ ८१ ॥ घायेंमारितमहा
वीर ॥ भडभडांवाहेरुधिर ॥ लोटिलाअशुद्धाचापूर ॥ नदीदुस्तरचालि
ली ॥ ८२ ॥ नदीवाहतांदुथडी ॥ झाल्याप्रेतांच्यादरडी ॥ बोढणेंकम
ठपृष्ठीगाढी ॥ गरजकुरवंडीमहाग्राह ॥८३॥ बाबरझोटियाकेशजाळ ॥
तेचिनदीमाजीशेवाळ ॥ मगरसुसरमहाविशाळ ॥ शिरेंविक्राळवीरां
चीं ॥ ८४ ॥ बाणतरतीसपिच्छेंसीं ॥ तेचिमत्स्यरणनदीसी ॥ धनु
ष्येंवाहतीशितेंसीं ॥ वक्रगतीसींतेसर्प ॥ ८५ ॥ पडलेगजांचेअलंका
र ॥ घंटाघागरियानूपुर ॥ तेचिनदीमाजीदुर्धर ॥ लहानथोरकिरकि
रती ॥ ८६ ॥ रथध्वजेंसींवाहत ॥ तेंचितारुंशिडेंसहित ॥ वीरांमो
क्षभरिलेंभरित ॥ तारुंतेथेंश्रीकृष्ण ॥ ८७॥ घायासरसेंशिरपडे ॥
स्वर्गापर्यंततेंउडे ॥ स्वर्गभोगत्यानावडे ॥ कृष्णाकडेतेंपरते ॥ ८८ ॥
कृष्णदृष्टींदेहत्याग ॥ तुच्छकरुनीसांडितीस्वर्ग ॥ जिंकिलाजन्मम



रणाचापांग ॥ सुखअव्यंगपावलें ॥ ८९ ॥ घायींउडालेंशिरकमळ ॥
टाकूनगेलेंध्रुवमंडळ ॥ पदनपवेचीअढळ ॥ उतावीळपरतलें ॥ ९० ॥
देहअर्पितांश्रीकृष्णासी ॥ चारीमुक्तीहोतीदासी ॥ म्हणोनिआलेंकृ
ष्णचरणासीं ॥ निजसुखासीपावलें ॥ ९१ ॥ घायींउडालेंशिरएक ॥
टाकूनगेलेंसत्यलोक ॥ ब्रह्मसदननावडेदेख ॥ कृष्णसदनापरतलें
॥९२॥ देखोनिश्रीकृष्णाचेंमुख ॥ धिःकारिलासत्यलोक ॥ ब्रह्मसद
नवांछितीमूर्ख ॥ परमसुखहरिचरणीं ॥ ९३ ॥ घायासरिसेंशिरउडे ॥
वैकुंठपर्यंततेंचढे ॥ एकदेशीगतीनावडे ॥ हरीकडेमुरडलें ॥ ९४ ॥
साडूनियांकृष्णनाथा ॥ आम्हींनघेऊंसलोकता ॥ हरिचरणींठेविला
माथा ॥ नघेऊंसर्वथावैकुंठ ॥ ९५ ॥ शिरउडालेंअंतराळीं ॥ अहंका
रमुकुटपडलातळीं ॥ शिरनउतरेचीभूतळीं ॥ हरीजवळीपावलें॥९६॥
जेथेंअभिमानतुटला ॥ तेथेंचित्यासहरीभेटला ॥ युद्धमिषेंलाभजा

हला ॥ वीरांफावलानिजमोक्ष ॥ ९७ ॥ अत्यंतप्रळयींचाचिद्घन ॥ वर्षत‌हेसंकर्षण ॥ वीरांचाअभिमानमर्दून ॥ लिंगदेहबंधनछेदिलें ॥ ९८ ॥ अधिकारियांमोक्षभावो ॥ द्यावयालागींकृष्णदेवो ॥ मिषभीमकीचाविवाहो ॥ रणींनिर्वाहोमोक्षाचा ॥ ९९ ॥ निधड्या वीरांजाहलीमुक्ती ॥ देहलोभियांकवणगती ॥ रणसांडोनियांजेपळती ॥ तेविन्मुखहोतीकृष्णासी ॥ १०० ॥ अश्वगजजेरणाआले ॥ तेहीश्रीकृष्णेंउद्धरिले ॥ युद्धसांडोनिपळाले ॥ तेपावलेअधोगती ॥ १ ॥ यापरीतोबळिभद्र ॥ कृपेनेंकोपलादुर्धर ॥ ब्रह्मसायुज्येंकरूनमार ॥ वीरेंवीरआटिले ॥ २ ॥ एकाजनार्दनींकौतुक ॥ कथा रहस्यसुखदायक ॥ पुढीलकथाअलोलिक ॥ समाधिसुखसंग्रामीं ॥ १०३ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेचैद्यमागधपराजयोनामदशमःप्रसंगः ॥ १० ॥

## प्रसंग ११ वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥येरीकडेवक्रदंत ॥ सात्विकातेंपाचारित ॥ कोपेंख
वळलाअद्भुत ॥ टाकूनबोलतयेरयेरां ॥ १ ॥ केवळसात्विकतूंपैंगा ॥
तापसियांमाजीतूंहोसीदांडगा ॥ नसाहवेयुद्धवेगा ॥ पळोनवमागांजा
शील ॥२॥ सात्विकासीयुद्धघडे॥ हेंतंवबोलणेंचिकुडें ॥ केवळसात्वि
कतेंबापुडें ॥ युद्धापुढेंकेंविराहें ॥ ३ ॥ अरेमीसात्विकांसींनभेटतां ॥वक्र
दंतासींश्लाघ्यता ॥ तुझीतोंडीनरेवक्रता ॥ सात्विकतापाहेंमाझी ॥४॥
सात्विकाशरणनरिघतांसाचें ॥ तोंवरीतुम्हांसत्यत्वकैचें ॥ लेइलेतिअ
भिमानाचींकवचें ॥ लक्ष्यसाचेंभेदीन ॥५॥ लागतांसात्विकाचाघावो॥
परतोनिजावयानाहींठावो ॥ आलीवाटभुलवीनपहाहो ॥ महाबा
होखवळला ॥ ६ ॥ घायेंवीणघेईनप्राण ॥ तुझीमाताकरीलरुदन॥ति
चेंदेखोंनशकसीवदन ॥ देहबंधनछेदितां ॥७॥ वक्रदंतकोपलागाढा ॥



वाहिलारजतमांचामेंढा ॥ ममताभालीतडतडां ॥ कोपावेगाढाविं
धित ॥ ८ ॥ बापसात्विकनिजगडा ॥ बोधकवचेंलेइलागाढा ॥
निजबळेंचालिलापुढां ॥ भालीतडतडांतोडिल्या ॥ ९ ॥ लक्ष्य
अंतुल्यापरवडी ॥ गुणधनुष्याचेंशीततोडी ॥ खुंटलीविषयबाणाची
वोढी ॥ धनुष्यलडबडीनुसतेंची ॥ १० ॥ धनुष्यतुटलियापाठीं ॥
कामकोतेसवेगउठी ॥ सत्वेंसात्विकजगजेठी ॥ लक्ष्यदृष्टींसाधि
लें ॥ ११ ॥ काढिलाकामांतकबाण ॥ धगधगितअतिदारुण ॥
कामकोतेंकेलेंचूर्ण ॥ बाणेंसंपूर्णसात्विकें ॥ १२ ॥ घेऊनिक्रोधा
चापरिघ ॥ अविचारीटाकिलाअव्यंग ॥ शांतिबाणींविंधिलाचां
ग ॥ घायेंपरिघउडविला ॥ १३ ॥ घेऊनलोभाचीपैंगदा ॥
भुलवूनिकरितांहृदयभेदा ॥ वैराग्यबाणेंविंधिलासांधा ॥ तोडोनि

गदासोडिली ॥ १४ ॥ गदातुटलियावरी ॥ मोहओडणआदळे उरीं ॥ गुप्तशस्त्रघेऊनिकरीं ॥ हृदयावरीहाणोंआला ॥ १५ ॥ दृढसात्वि काचेनुसंधानें ॥ विवेकतेजेंतिखटबाणें ॥ विंधोनिउडविलींओडणें ॥ वक्रदंतमार्गेसारिला ॥ १६ ॥ घेऊनीवासनेचेंवज्र ॥ वेगेंधाविन्नलादं तवक्र ॥ भेदावयाजिव्हार ॥ सोहंकारचालिला ॥ १७ ॥ सात्विकें थोरधरिलाधीर ॥ अव्ययतेजेंतिखटतीर ॥ विंधोनिवज्रकेलेंचूर ॥ घायींअंबरगार्जिन्नलें ॥ १८ ॥ वज्रछेदिलेंवीरनायकें ॥ वक्रदंतचालि लारोखें ॥ चहूंमुक्तींचींवाघनखें ॥ हृदर्थीतिखेंहाणोंआला ॥ १९ ॥ सात्विकउठिलाआंगें ॥ शस्त्रसंधानतोडिलेंवेगें ॥ लातामारोनिघातला मागें ॥ मोडिलींरागेंवाघनखें ॥ २० ॥ मगसात्विकेंदीधलीहांक ॥ वक्रदंतेंघेतलाधाक ॥ देहालोभाभेणेंदेख ॥ अधोमुखपळाला ॥ २१ ॥



पळतांभुललातोवाट ॥ पडिलाअभिमानाचामुगुट ॥ सात्विक झुंजारचोखट ॥ पळत्यापाठींनलागेची ॥ २२ ॥ जरासंधआ णिगद ॥ दोघांचढलारणमद ॥ क्रोधेंझालेसक्रोध ॥ वीरउन्नद्धलोटले ॥ २३ ॥ मेरुमांदारझगटले ॥ तैसेरथासींरथतगटले ॥ दोघेमहा मारींपेटले ॥ विरुद्धबोलेंबोलती ॥ २४ ॥ सन्मुखदेखोनियांगद ॥ हांसिन्नलाजरासंध ॥ मजसींपुरेंनशकेगोविंद ॥ बुद्धिमंदतूंकेंचा ॥ २५ ॥ विपाकेंजरीऐसेंघडे ॥ जैंअंधारींसूर्यबुडे ॥ उडुगणस्वयेंभिं तींचढे ॥ तरीयुद्धनघडेतुजमजसीं ॥ २६ ॥ मशकाचेनिचरणप्रहारें ॥ महामेरूउभाचिचिरे ॥ इंद्रासींभिडिजेउंदिरें ॥ तैतुजमजसमोरेंसंग्रा म ॥ २७ ॥ वटामजीसिंहसांपडे ॥ जांभाईमाजीआकाशबुडे ॥ वा गुरेमाजीवाराअडे ॥ तैंतुजमजघडेसंग्राम ॥ २८ ॥ मुरकुटसगळासमु

द्रसोखी ॥ गजघालिजेमुंगीचेमुखीं ॥ आकाशपडळकाढिजेटांकीं ॥
तैंतुंजमजवडेसंग्राम ॥ २९ ॥ चित्रींचादेखोनियांसर्प ॥ गरुडांअंगीं
सुटेमहाकंप ॥ तैसाचतुझाहासाटोप ॥ खटाटोपघडेयुद्धीं ॥ ३० ॥
सूर्यातेंखद्योतरणांगणीं ॥ भिडेंशकतीझोंडधरणी ॥ तरीतुजमजला
गोनी ॥ पडिपाडरणींअसेना ॥३१॥ नवग्रहांचेंबळघटासीं ॥ परीं
नभिडवेपाषाणासीं ॥ तेवींतूंयादवांमाजीयोद्धाहोसी ॥ तरीमजसी
नभिडवे ॥ ३२ ॥ ससाचढोनसिंहाचेमाथां ॥ जरीनाचवीलनिजस
त्ता ॥ तरीतुजमजसीसमता ॥युद्धींसर्वथाघडेना ॥ ३३॥ वांझेचापुत्र
महारोगी ॥ संध्यारागकरुनीभोगी ॥ कांसवघृतासीआरोगी ॥ नि
र्जरारोगीव्हावया ॥ ३४ ॥ तैसाप्रकारआजिझाला ॥ यादववीरींदु
काळपडला ॥ यालागींगदयेथेंधाडिला ॥ नावाजिलापुरुषार्थी ॥३५॥



गदूनावाचेरेशब्दीं ॥ तुझासंग्रहकीजेवैद्यीं ॥ पोतडींघालोनकाखेखां
दीं ॥ दारोदारींहिंडविती ॥ ३६ ॥ रोगियांमाजीतूंसबळ ॥ तुजयु
द्धींकैंचेंरेबळ ॥ धर्मवाटदिधलीपळ ॥ सांडींस्थळयुद्धाचें ॥ ३७ ॥
हांसूनिबोलिलावीरगदू ॥ तुझाजरेंनेंसांधिलारेसांधू ॥ संधानबैस
वींसुबद्धू ॥ फाडशुद्धतुजकरूंआलों ॥ ३८ ॥ शस्त्रवालीनमीगदू ॥
काढीनअभिमानाचारेंदू ॥ तोडीनजरामरणकंदू ॥ हृदयशुद्धकरीन
॥ ३९॥ ऐकोनिखवळलामागध ॥ झालाकवचेंसींसन्नद्ध ॥ किती
करशीलअनुवाद ॥ होईसावधचावटा ॥ ४० ॥ वोढीकाढोनीसत्रा
णें ॥ गदींविंधिलाआठबाणें ॥ येरूधनुर्विद्याजाणे ॥ बाणतत्क्षणीं
तोडिले ॥ ४१ ॥ गदेंओढोनियांकानाडी ॥ धगधगितबाणसोडी ॥
पाडीजरासंधाझापडी ॥ निवारणझणीनकरवे ॥ ४२ ॥ जरेनेंसांधि

लाजासांद्र ॥ तोसांधापाहनिर्विधीगदू ॥ वर्मीखोंचलाजरासंधू ॥
रणपदूउतरला ॥ ४३ ॥ बाणखोंचलाअतिनिगुती ॥ विकळगेला
दोहींहातीं ॥ धनुष्यगळूनपडिलेंक्षितीं ॥ गदेंख्यातीलाविली ॥४४॥
मागधाशींपडलेठक ॥ तटस्थगेलामुहूर्तएक ॥ पोटींधरिलाजीधा
क ॥ तुटलेंतुकयुद्धाचें ॥ ४५ ॥ जरासंधमागेंपाहे ॥ रणींकोणीच
नदेखेसाह्य ॥ बळिभद्रेंझोडिलेराय ॥ हुंबतघायेंपडियेले ॥४६॥ मुळीं
चझालाअपशकून ॥ पडिलेहातींचेधनुष्यबाण ॥ सिद्धीनपवेचिआंग
वण ॥ रणांगणसांडिलें ॥४७॥ काळसाह्यश्रीकृष्णासी ॥ यशआ
लेंयादवांशीं ॥ पाठीदेऊनगदासी ॥ निघेवेगेंसींजरासंध ॥ ४८ ॥
जरासंधमोडल्यापाठीं ॥ पळतीराजेदेखतांदृष्टी ॥ तिहिंसांडिलीयुद्ध
गोष्टी ॥ उठाउठीपळाले ॥ ४९ ॥ यादवांयशआलेंगाढें ॥ पळतां



नपाहेमागेंपुढें ॥ रथगजसांडोनिघोंडे ॥ वीरगाढेपळाले ॥ ५० ॥
पळतांपडतातीवेंगडी ॥ योद्धेनव्हों आम्हींवऱ्हाडी ॥ बळिभद्रेंनिजप-
रवडी ॥ रणलुगडींवोपियेलीं ॥ ५१ ॥ नवरीचावडीलभावो ॥ ते
णेंकेलाजीगौरवो ॥ पाठीतांबड्याकरोनिपहाहो ॥ रावोरायेंबोळवि
ले ॥ ५२ ॥ निजप्राप्तीसीविन्मुख ॥ युद्धींझालापराङ्मुख ॥ राजेनर
वीरअनेक ॥ पळतांदुःखपावले ॥ ५३ ॥ देहलाभियेंबापुडीं ॥ पा
यींमयतेचीवेंगडी ॥ विस्मरणाचीखरसतोंडीं ॥ जेंमुरकुंडोघातलीं
॥ ५४ ॥ अत्यंनप्रळयकरितांदेख ॥ संकर्षणेंदिधलीहांक ॥ पोटीं
घेऊनियांधाक ॥ एकाएकपळाले ॥ ५५ ॥ सांडिलींपुरुषार्थाचींलु
गडीं ॥ केवळनागवींउघडीं ॥ विन्मुखपडतांउबडीं ॥ मलींमडींहोऊ
निठेलीं ॥ ५६ ॥ चहूंपुरुषार्थींनहोयवाट ॥ केवळनरस्तुतीचेभा

ट ॥ करितीयुक्तीचीखटपट ॥ भिकेंपोटभरूंआले ॥ ५७ ॥ एकल
टिकेंकरूनिखत ॥ धरणेंधरूंऐसेंबोलत ॥ आम्हांसीविन्मुखजगन्ना
थ ॥ जीवघातकरूंनका ॥ ५८ ॥ नवविधासांडूनिलुगडींवेगीं ॥
प्रपंचराखलावितोआंगीं ॥ लक्षचुकोनझालेयोगी ॥ भिकेलागींहिं
डावया ॥ ५९ ॥ एकमरणाचेनिधाकें ॥ काखेलोभाचेंचौडुकें ॥
प्रपंचगोंधळाचेहरिखें ॥ उदोम्हणुनीनाचती ॥ ६० ॥ एकींधाकधे
तलाभारी ॥ धनलोभेंकांपवितीटिरी ॥ अधर्मटोलेवाजतीशिरीं ॥
मुखींउच्चारीनकारा ॥ ६१ ॥ कामखंडेरायापुढें ॥ एककुतरेंझालेंगा
ढें ॥ कोणीआलियादारापुढें ॥ वसवसूनीउठती ॥ ६२ ॥ एकझा
लेकापडी ॥ सलोभलोभेंरंगविलींलुगडीं ॥ धरूनिजीविकेचीगोडी ॥
तीर्थपरवडीसांगती ॥ ६३ ॥ पळतांनपळवेनिश्चित ॥ म्हणोनिबैस



लेध्यानस्थ ॥ पूजालोकांचीवांछित ॥ भोगींचित्तठेवोनियां ॥ ६४ ॥
दांतींतृणतोडितीपाहीं ॥ एकम्हणतीआम्हीगाई ॥ पशुझालोंमनुष्य
देहीं ॥ अभक्ष्यपाहींभक्षितां ॥ ६५ ॥ केवळदेहलोभासाठीं ॥ मोक्ष
श्रियेसीपाडिलीतुटी ॥ युद्धींपळालियापाठीं ॥ आपदामोठीवीरां
सी ॥ ६६ ॥ यादववीरजगजेठी ॥ नलागतपळत्याचेपाठी ॥ भेडा
वलीनपहातीचदृष्टीं ॥ उठाउठींपळाले ॥ ६७ ॥ रणींजिंकिलेमहा
शूर ॥ तुरेंवाजतीअपार ॥ विजयीजाहलेयादववीर ॥ जयजयकार
प्रवर्तला ॥ ६८ ॥ वीरसांगतीयुद्धगोष्टी ॥ सोडिल्याकवचांच्यागां
ठी ॥ उल्हासभीमकीच्यापोटीं ॥ हरिखसृष्टींनसमाये ॥ ६९ ॥
आपुलेनपडतीरणीं ॥ बंधुआलेनाहींतकोणी ॥ राजेगेलेजीपळूनी ॥
भीमकीमनींहरिखली ॥ ७० ॥ पुढेंहोईलविनोदकथा ॥ युद्धरुक्मि

याकृष्णनाथा ॥ तयाविनोदाचियाअर्था ॥ संतींपरमार्थापरिसावें ॥ ७१ ॥ कृष्णरुक्मियासन्नद्ध ॥ दोघांहोईलद्वंद्वयुद्ध ॥ मेहुणेपणाचाविनोद ॥ अतिविनोदनिकराचा ॥ ७२ ॥ पुढीलकथाअतिगहन ॥ रसाळआहेनिरूपण ॥ एकाविनवीजनार्दन ॥ सावधानवृत्तींपरिसावें ॥ ७३ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेयादवविजयोनामएकादशःप्रसंगः ॥ ११ ॥

॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥

## प्रसंग १२ रा.



श्रीकृष्णेशायनमः॥ ॥निजमंडपींशिशुपाळ॥ करीतहोतागदारोळ॥ भी
मकीघेऊनगेलागोपाळ ॥ ऐकोनविकळपडियेला ॥१॥पांडुरवर्णझाले
डोळे॥ मुखांतूनलाळगळे ॥ सेवकधरितीआंगबळें ॥ गात्रेंविकळपडि
येलीं ॥२॥ भीमकीअप्राप्तीचेबाण ॥ हृदयींलागलेदारुण ॥ घायेंवीणघे
तलाप्राण ॥ अकालमरणवोढवलें ॥३॥ वोखटवाणेंदिसेमुख ॥ नाडीतु
टल्यानिःशेषदेख ॥ कृष्णधाकाचीधुकधुक ॥ हृदयामाजीउरलीअसे
॥४॥ बोंबउठलीमंडपद्वारीं ॥ मिळालियानरनारी ॥ मातायेऊनरुदनक
री ॥ कपाळकरींपिटीत ॥५ ॥ सिद्धिनपवेचीशोभन ॥ वांयांगेलेंबरमा
यपण ॥ अंबिकाक्षोभलीजाण ॥ वराचेप्राणवांचोतकां ॥६ ॥ थोरओढ
वलेंवोदुःख ॥नदेखोंचिसुनमुख ॥ बुडालेंसोहळ्याचेंसुख॥ हरिखींविख
कालवीलें ॥७॥ अगेहारुक्मियादुर्बुद्धी ॥ नपाहेचलग्नशुद्धी॥मृत्युपंच
काचेसंधी ॥ लग्नसंधिमांडिली ॥८॥ कृष्णज्योतिषीहोनिका ॥ वशनो



हेपांचांपंचकां ॥ काळसाधिलानेटका ॥ समयोदेखातोजाणे ॥९॥ तेणें
चिसाधिलीगेवेळ ॥ साधोनगेलीभीमकबाळ॥ आमुचेंचीकरंटेंकपाळ॥
आतांशिशुपाळवांचवा ॥१०॥ विलापकरूनिअनेक ॥ शिंपिलेंशिशु
पाळाचेंमुख ॥ वारावालितीएक ॥ झालानावेकसावध ॥११॥ उठूनिब
सलाएकसरें ॥ श्वासघातलापैंथोर ॥ दुःखहृदयींचेंनावरे ॥ नेत्रद्वारींज
ळचालिलें ॥१२॥ शिशुपाळाआलेंरुदन ॥ नधरतचाललेंस्फुंदन ॥ धी
रेंआवरूनियांजाण ॥ शहाणपणमांडिलें ॥१३॥ नोवरीनेलीसुंदर ॥ प
डिलेंममर्थासीवैर॥कृष्णनेटकाझुंजार॥आणिबळिभद्रमहाबळी ॥१४॥
हेचिदोघेनावरती॥येरयादवनेणोंकिती ॥ ऐसेंविचारूनिचित्तीं ॥ का
यवीरांप्रतीबोलिला ॥१५॥ सैन्यपालाणापालाणा ॥ घावघालारेनि
शाणा ॥ रथसंजोगोनिआणा ॥ रणांगणाजाऊंवेगीं ॥१६॥ सन्नद्धकरू
नियांदळ ॥ रथींचढलाशिशुपाळ ॥ नगरद्वाराआलेसकळ ॥ पुढेंघाया

ळभेटले ॥१७॥ घायींतुटलेजीसबळ ॥ अशुद्धेंझालेजांबंबाळ ॥ बाणीं
भेदलेंकपाळ ॥ वीरविकळपडताती ॥१८॥ वीरींघेतलेंघायबरें ॥ म्हण
तीपळारेपळारे ॥ मारिलेजालबळिभद्रें ॥ साह्यदुसरेंकोणीनये ॥१९॥
एकेंघेतलाभेदरा ॥ एककांपतीथरथरां ॥ मारूंनकाबाबळिभद्रा ॥ दास
डिंगराआह्मीतुझे॥२०॥एकांचेतुटलेहात ॥ एकींविचकिलेदांत॥एकेंक
ण्हतकुंथत ॥ तवकादेतपैंएक ॥ २१ ॥ घाईंजर्जरबहुत ॥ एकबतहुं
बत॥एकाएकाचींलोंबतीआतें ॥ घायींकातेंअडकलीं ॥ २२ ॥ एकरड
तपडत ॥एकअत्यंतचडफडित ॥ एकपाणीजीमागत ॥ खुणाहातेंदाउ
नी ॥२३॥ मस्तकफुटोनिवाहेरुधिर ॥ एकाचेंअर्धतुटलेंशिर ॥ एकाच
घायींबुडालेतीर ॥ तेणेंवीरतळमळती ॥२४॥ भलेगौरविलेवऱ्हाडी ॥
स्थितीगेलीलेणींलुगडीं ॥ एकनागवींउघडीं॥भेलींमढींवोढिलीं॥२५॥
घायाळाघालोनिवोढणां ॥ धनुष्यदंडाच्याअडणी ॥ उचलोनियांचौधीं



जणीं ॥ वारश्रेणीआटिल्या ॥२६॥ एकमार्गींझालेंपुरें ॥ एकाचेंआणि
लेंखटारें ॥ वीरआटिलेजीवीरें ॥ बळिभद्रेंमारिले ॥ २७॥ गयखोंचले
मुगुटांचे ॥ अत्यंतप्राणविकळत्यांचे ॥ सेवकउचलितीपायांचे ॥ ढाळे
मोरकुंचेवारिती ॥ २८॥ देखोनिदचकलाशिशुपाळ ॥ धाकिन्नलेंत्याचें
दळ ॥ राजेमारिलेसबळ ॥ प्रबळबळयादवांचें ॥२९॥युद्धींझालेपराङ्
मुख ॥ राजेभंगिलेअनेक ॥ आलेजरासंधादिक ॥ मोडलेंकटकघेऊनी
॥३०॥भेटलाशिशुपाळसन्मुख ॥ अत्यंतकोमाइलेंमुख ॥ बुडालेंसोह
ळ्याचेंसुख ॥ हृदयींदुःखभीमकीचें ॥३१॥ दुःखेंमुखकाळवंडलें ॥ दो
न्हीओठजीवाळले ॥ लाजेंनबोलवेबोलें ॥ तेंदेखिलेंजरासंधें ॥३२॥ म
गम्हणेपुरुषपंचानना ॥ व्यर्थखेदकांकरिसीमना ॥ प्राप्तअप्राप्तीचोगण
ना ॥ आधीनकोणापैंनाहीं ॥३३॥ संसारम्हणजेखांबसूत्र ॥ चौऱ्याय
शींलक्षपुतळ्याविचित्र ॥ त्यांचासूत्रधारीईश्वर ॥ त्याचियाइच्छेंवर्तिजे

॥ ३४ ॥आपणराहोनियांदूरी ॥ हालवीप्राचीनाचीदोरी ॥भूतेंतदनुसा रसारीं॥ निजव्यापारींवर्तती ॥३५॥ तेथेंसुखदुःखनिजतंत्र ॥ मांडूनि ठेविलेंस्वतंत्र ॥ तेतेतयेंगतीपात्र ॥ अहोरात्रहोताती ॥३६॥ येथेंयश आलियाचेंसुख ॥ अथवाअपेशाचेंदुःख ॥ अहंपणींमानितीमूर्ख ॥क र्तादेखतोनव्हे ॥३७ ॥ येथेंकर्ताजोमोम्हणे ॥ तोपडेसुखदुःखानागव णें ॥ जन्ममरणासी आवंतणें ॥ दोधलेंतेणेंसर्वथा॥३८॥अहंकर्तव्यप णाचाभावो ॥ तेणेंचिसुखदुःखाचाठावो ॥ जन्ममरणाचानिर्वाहो ॥ ते णेंचिपाहाहोहोतसे ॥ ३९॥ यालागींअहंकर्तव्यता ॥ नधरावीगासर्व था ॥ भीमकीअप्राप्तीचीव्यथा ॥दुर्मतायेऊंनेदीं ॥४०॥ म्यांचिपाहें पांकेवळ ॥तेवीसअक्षौहिणीदळ ॥ युद्धकेलेंसत्राँवेळ ॥ एकवेळजयोआ ला ॥४१॥ भंगझाल्याचेंदुःख ॥ यशआलियाचेंसुख ॥ नमानुनीयांदे ख॥ यथासुखेंवर्तावें ॥४२॥एवंसुखदुःखजेंआहे ॥ तेंकाळाधीनपाहें ॥



तोकाळज्यासीसाह्यहोय॥ तोचिलाहेयशातें ॥ ४३ ॥ आजितुजयुद्धा सीजातां॥ यशनयेगासर्वथा॥ काळसाह्यकृष्णनाथा ॥झालातत्त्वतांनि जबळें॥ ४४॥काळसाह्यझालेपणीं ॥ प्राप्तझालीपैंरुक्मिणी ॥ मजसहि तराजेरणांगणीं ॥ तृणप्रायकरूनिजिंकिले ॥४५ ॥ तोजंवकाळसाह्यना हीं ॥तंववरीयुद्धकरिशीलकाई ॥ वीरझोडिजेतीलघायीं ॥ योद्धेठायींप डतील॥४६॥जंवअनुकूळनाहींकाळ॥ तोंवरीकायकरिशीलबळ ॥ सि द्धीनपवेसकळ॥ श्रमकेवलपावशील॥ ४७॥ यालागींधीरधरींशहाण पणीं॥ जंवहोयकाळसाह्याचीमांडणी॥ मगयादवजिंकूनअर्धक्षणीं ॥ केवीरणींराहतील ॥४८॥ यापरीराजमित्रजरासंध॥ करीतशिशुपाळा सीबोध॥मगसांडोनियुद्धक्रोध॥ निजनगरासीनिघाला॥४९ ॥ शिशु पाळासीयुद्धअंत ॥ जीवचिवेताकृष्णनाथ ॥ आजिचाचुकलाजीअन र्थ॥ हितमानितदमघोष ॥५०॥ माताम्हणेजरासंधासी॥ उत्तीर्णनव्हें

पकारासी ॥ तुवांवांचविलेंशिशुपाळासी ॥ पुत्रदानासीतूंदाता ॥५१॥ ऐसेंमानूनियांसुख ॥ परतलादमघोषदेख ॥घेऊनिसायरेंसेवक ॥ एकए कपरतले ॥५२॥ युद्धींयादवांनींमारितां ॥ राजेउरलेजेझुंजतां ॥ तेही मानूनियांहिता ॥ मागेंसर्वथानिघाले ॥५३॥ घायींजर्जरनेणों किती ॥ नागवसैन्यसंपत्ती ॥ आपुलालियानगराप्रती ॥ वेगेंभूपतीनिघाले ॥५४॥ मागेंपरतलाशिशुपाळ ॥ राजेचालिलेसकळ ॥ रुक्मियाकोप लाप्रबळ॥सन्नद्धदळतेणेंकेलें ॥५५॥समरंगणींहोयविन्मुख ॥तेव्हांचि त्याचेंकाळेंमुख ॥ कवणवांचल्याचेंसुख ॥ वेऊनिविखमरावें ॥ ५६ ॥ जरासंधाशिशुपाळादेखत ॥ सकळराजेहीऐकत ॥ तंवउभाराहोनिभीम कसुत॥थोरगर्जतापैंझाला ॥५७॥ तुम्हींसांडिलेंपुरुषार्था॥मीतंवनेऊंने दींराजदुहिता ॥ रणींजिंकोनकृष्णनाथा ॥ भीमकाआतांआणीन ॥५८॥ कृष्णविभांडोनीबाणीं॥ हिरोनिनाणींचरुक्मिणी ॥ तरीस्वध



र्मसांडिजेब्राह्मणीं ॥ मजलागोनीतोदोष॥५९॥जेकरितीसाधुनिन्दा ॥ त्यापापाच्यामजआपदा ॥ रणींनाजिंकितांगोविंदा॥ जरीमीनुमतापर तेन ॥६०॥ विद्याघेऊनगर्वायेती ॥ विकल्पूनगुरुसिनिंदती ॥ तींपापें मजहोती ॥ जरीमीश्रीपतीनजिंकें ॥६१॥ केवळपूज्यमातापिता ॥त्यां सीपुत्रहाणीलाथा ॥ तींपापेंमजचीहोतआतां ॥जरीश्रीकृष्णनाथानजिं कें॥६२॥ ॥देखोनिसाधुसज्जनांसी ॥ दोषआरोपितीत्यांसी॥ तींतींपा पेंमजपासीं ॥ जरीमीकृष्णासीनजिंकें ॥६३॥ कृष्णनजिंकितांरणीं ॥ घेऊननयेतांरुक्मणी ॥ पुरीनप्रवेशेंकौंडिणी ॥ मुखपरतोनीदाखवींना ॥६४॥ ऐसीवाहूनियांआण ॥ कवचेंलेइलाआपण॥ वेगेंघेऊनधनुष्य बाण ॥ आंगवणपहामाझी ॥६५॥ कृष्णअज्ञानाचेंअनादी॥ त्यासीह दयींनाहींवुद्धी ॥ पर्णूपाहेराक्षसविधीं ॥ तोमीसिद्धीजाऊंनेदीं ॥६६॥ कृष्णगर्वितएकलेपणीं ॥ दुजियातेंदृष्टीनाणी ॥ हिरोननेलीमाजीबहि

णी ॥ तोमीबाणींदंडीन॥६७॥दांतखातसेकरकरां ॥ धूम्रनिघतनेत्रद्वा
र ॥ रागेंकांपतसेथरथरां ॥ रहंवराचढियेला॥६८॥ रथींबैसलामदग
र्वित ॥ वेगेंसारथ्यातेंम्हणत ॥ चपळचौताळोंदेरथ॥कृष्णनाथजेथेंअसे
॥६९॥आजिकृष्णासीसन्नद्ध ॥ करणेंअसेद्वंद्वयुद्ध ॥ अगर्वीधरितोगर्व
मद ॥ बुद्धिमंदश्रीकृष्ण ॥७०॥आजिमाझ्यातिखटबाणीं ॥ कृष्णखि
ळीनरणांगणीं ॥ चोरूनिनेतोमाझीबहिणी ॥ कैसेनरुक्मिणीजिरेल
॥७१॥सैन्यअवलोकिलेंदृष्टीं ॥ वीरचालिलेजगजेठी ॥ अश्वगजरथां
चियाथाटीं ॥ शस्त्रेंमुष्टींझळकती॥७२॥चातुरंगसैन्यसकळ॥एकअक्षौ
हिणीदळ ॥ सन्नद्धकरूनियांसकळ॥ संख्याकेवळपरियेसा॥ ७३॥दोन
लक्षअठरासहस्र ॥ आणिसातशेंअधिकवीर ॥ संख्याअक्षौहिणीप्रका
र ॥ केलानिर्धारमनाचा ॥ ७४ ॥ कितीगजकितीरथ ॥ अश्वपदा
तीसमस्त ॥ विभागसंख्यासुनिश्चित ॥ पुराणोक्तसांगेन ॥ ७५ ॥



एकवीससहस्रआठशत ॥ सत्तरीसंख्याजीरथ ॥ तितुकेचिगजभारउन्न
त॥सैन्यआंतचालती ॥ ७६ ॥ एकलक्षसहस्रनव ॥ तीनशतेंपान्नसअ
श्व॥ पायांचेवीरअभिनव ॥ सांगेनसर्वपरियेसा ॥७७॥ पांसष्टसहस्रसा
तशतें॥ एकदशकअधिकतेथें ॥ वीरपायांचेभिडते॥ युद्धींपुरतेनिजगडे
॥ ७८ ॥ इतुकीसैन्याचीमिळणी ॥ तयानांवअक्षौहिणी ॥ संख्याबो
लिलीपुराणीं ॥ महामुनीश्रीव्यासें॥७९॥ऐसेंनिजसैन्यअद्भुत ॥ त्या
माजीरुक्मियाविराजित ॥ साह्यआलेराजेदक्षिणाइत ॥ वीरगर्जतीमहा
बळी ॥ ८० ॥ रणींजिंकोनिजरासंध ॥ मिळालेगदहलायुध॥अविवेक
रितातीविनोद ॥ थोरआल्हादपैंत्याचा ॥ ८१ ॥ यादवमिळोनिथोर
थोर ॥ करितीपरतावयाचाविचार ॥ येतांदेखोनिपारिकाभार॥मगसा
मोरेलोटले ॥८२॥ दोन्हीसैन्यांझालामेळा ॥ घायींउठलाहलकल्लोळ॥
वाजंत्र्यांचाध्वनीप्रबळ ॥ रणवेतांळखवळला ॥ ८३ ॥ कोपेंचालिलारु

क्मियावीरु॥दाटोनाआलायादवभारु ॥ तेथेनदिसेशारंगधरु ॥रथस्वरूपेलिला ॥ ८४ ॥ एकाएकींएकलाचक्रपाणी ॥ दुरोनिदेखिलानयनीं ॥ एकारथींकृष्णआणिरुक्मिणी ॥ देखोनिमनींप्रज्वाळला॥८५॥ सांडोनिगोत्रजकुटुंबासा॥जेवींवैरागोनिंघयोगासी ॥ तेवींसैन्यसांडोनियादवांसी ॥ एकेरथेंसींधांविन्नला ॥८६॥ धनुष्यमांडूनमांडणीं ॥ गुणवाहिलातत्क्षणीं ॥ बाणलावूनियांगुणीं ॥ वोढीकाढोनीचालिला ॥ ८७ ॥ कृष्णदेवाचाआदिदेवा ॥ ईश्वरनियंतानेणेप्रभावो ॥ कुमतीधरोनियांमदगर्वो ॥ कायपहाहोबोलत ॥ ८८ ॥ कृष्णासीम्हणेराहेंसाहें ॥ माझाबाणआलापाहें ॥ चोरीकरूनपळशीलकाय ॥कोणमायराखील ॥८९॥ जगामाजीतूंचोरटाहोसी ॥ चोरीदिसूंनदेशालोकांसा॥ आजिमीपावलोंरागासी ॥ केउताजाशीलनिजचोरा ॥ ९० ॥ उद्देशदेवांइंद्रादिकीं ॥ होमकीजेअग्निमुखीं ॥ तेंअवघेंतूंखाशीशेखीं ॥ अग्नि



मुखींकांहींनुरे ॥ ९१ ॥ देवह्मणतीआह्मासीपावलें ॥त्यांसीठकवूनीहव्यत्वांनेलें ॥ तेंकाउळेंमतयेथेंनचाले ॥ सांडींवहिलेंभीमकीसी ॥९२॥ जन्मोनियांयादववंशीं ॥ कुळगोत्रासीनाशकरिसी ॥ बुडविलेंनामरूपाशीं ॥ जातीतुजपाशींपैंनाहीं ॥९३॥ भोगअवघेभोगशी ॥ आणितूंयोगियाह्मणीबिशी ॥ मूळमायातेंतुजपाशीं ॥ वेषधरिशीकपटाचा ॥ ९४ ॥ तुझियाकपटाचीझाडणी ॥ करावयाआलोंमीगुणीं ॥ झाडणीकरीनरणांगणीं ॥ झणींपळोनीजाशील ॥ ९५ ॥ सांडींसांडींरेमाझीबहिणी ॥ नाहींतरीखोंचीनतिखटबाणीं ॥ निजबाणलावूनगुणीं ॥ चक्रपाणीधांविन्नला॥९६॥ शार्ङ्गटणत्कारुनिहरी ॥ सहाबाणघेतलेकरीं ॥ तीनसोडूनमाझारीं ॥ धनुष्यकरींचेंछेदिलें ॥९७॥ सवेंचिसोडिलेंआठबाणांसी ॥ चारीचहूंवारुंसी ॥ सारथीपाडनधरणीसी ॥ ध्वजस्तंभछेदिला ॥९८॥ रुक्मियाकोपाचढिन्नलाभारी ॥ पंचीबाणघेतले

करीं ॥ रागेंसोडिलेकृष्णावरी ॥बळेंनिर्धारींविंधित ॥९९॥ कृष्णधनु
वाडानिजगडी ॥अचुकसंधानपरवडी ॥ पांचहीबाणबाणेंतोडी ॥ धनु
ष्यपाडीछेदुनो ॥१००॥ आणीकधनुष्यघेतलेंवेगें ॥ सन्मुखाविंधोंआ
लारागें ॥ तेहीतोडिलेंश्रीरंगे ॥ आणीकआंगेंघेतलें ॥ १ ॥
बाणलावोनियांवोढी ॥ तेंहीकृष्णसवेंचितोडी ॥ जेंजेंधनुष्यरुक्मिया
काढी ॥ तेंतेंतोडीश्रीकृष्ण ॥२॥ धनुष्यघेतलेंघावटाळुनी ॥ अग्निअस्त्र
लाविलेंगुणीं ॥ धूम्रकोंदलादिशाव्यापुन ॥ज्वाळागगनींनसमाती॥३॥
पर्जन्यास्त्रसोडहरी ॥ मेघवर्षतीमुसळधारीं ॥ अग्निशांतिक्षणा
माझारीं ॥वेगेंश्रीहरीनेंपैंकेलो ॥४॥ येरेंवायव्यास्त्रलविलेंगुणीं ॥ झं
झामारुतसुटलारणीं ॥ वाऱ्यानेंजाऊंपाहेअवनी ॥ कानटाळींबैसलीं
॥५॥पर्वतास्त्रसोडीश्रीकृष्ण ॥ वारासांडिलाबुझोन ॥येरेंवज्रास्त्रसोडून ॥
गिरीतोडूनसांडिले ॥ ६ ॥ रुक्मियाकोपलाथोर ॥ कृष्णासीह्मणे



स्थीरा॥गुणींलाविलेंरुद्रास्त्र ॥ महारुद्रप्रगटला ॥७॥ दाढाविक्राळतिख
टा॥माथांमोकळियाजटा ॥काळिमाआलीसेकंठा ॥ मिशापिंगटाआ
रक्त॥८॥श्रीकृष्णअस्त्रविद्याचतुर ॥ अस्त्रींयोजिलाभस्मासुर ॥ बाण
देखोनिपळेरुद्र॥धाकेंथोरकांपतसे ॥९॥ रुक्मियाआणिकशस्त्रविचारी
॥ तंवकृष्णेंधनुष्यछेदिलेंकरीं ॥ सरलीकोदंडसामुग्री ॥ रथावरिकांहीं
नाहीं॥११०॥सरलीधनुष्याचीप्रौढी ॥ परिघघेऊनघालीउडी ॥ कृष्ण
विंधोनीपरिघतोडी॥अवघीपरवडीवांयांची ॥ ११ ॥ परिघखुंटलिया
पाठीं॥रागेंपट्टिशघेऊनियांउठी ॥ नधरतपातलाउठाउठी ॥ कृष्णदृष्टीं
सूदला॥१२॥कृष्णेंविंधिलेंतीनबाणां ॥ पट्टिशउडविलागगना ॥ सवें
चिशूळघेउनीजाणा॥हाणोंकृष्णापैंआला ॥१३॥ दांतखातसेकरकरां ॥
शूळभवंडीतसेगरगरां॥साहेंह्मणेशार्ङ्गधरा ॥ घायेंपुराकरीन ॥ १४ ॥
कृष्णेंबाणसोडिलेपाहीं ॥शूळतोडिलातिहींठायीं॥सवेंचिपाडिलाभुई ॥

तिहींठायींतीनखंडें॥११५॥ शूळवायांगेलाथोर ॥ रुक्मियादोनीचूरी
कर ॥ सर्वेचिघेऊनितोमर ॥ कृष्णासमोरधांविन्नला ॥११६ ॥ साहेंम्ह
णेकृष्णनाथा ॥ तोमरहाणोंपाहेमाथां ॥ माझारींविंधिलायेतयेतां ॥
घायेंमागुतासारिला ॥११७॥ बाणआदळिलाथोर ॥ छेदूनपाडिला
तोमर ॥रुक्मियाम्हणेनरमर ॥ शक्तिथोरकाढिली ॥ ११८ ॥ शक्तिघे
ऊनियांहातीं ॥ म्हणेकृष्णातुझापाडकिती ॥ रणींलावीनरेख्याती ॥
भद्रजातीलोटला ॥११९॥ कृष्णजेजेबाणसोडी ॥ शक्तिहस्तेंरुक्मिया
तोडी ॥ रथतोडिलामकरतोंडी ॥ शक्तिभवंडीहाणावया ॥ १२० ॥
कृष्णेंबाणसोडिलातिधारा ॥ रुक्मियासीलागलापिसारा ॥
मागेंसारिलाहातबारा ॥ शक्तिअंबराउडविली ॥ २१ ॥ रुक्मि
याचीक्षीणशक्ती ॥ साह्यआलेदक्षिणपती ॥ तीहींहांकारिला
श्रीपतो ॥ सैन्यसंपत्तिअनिवार ॥ २२ ॥ कृष्णनेटकाझुंझार ॥



बाणींत्रासिलामहावीर ॥ आठबाणींखोचलाधुर ॥ हाहाःकारउ
ठियला ॥ २३ ॥ बाणसोडिलेनिर्व्यंग ॥ घायींनिवटिलेंचातु
रंग ॥ त्याच्यासैन्याझालाभंग ॥ रणींश्रीरंगखवळला ॥ २४ ॥
बाणवरुषेशार्ङ्गधर ॥ सैन्याझालाथोरमार ॥ कोपेंखवळलारुक्मिया
वीर ॥ साटोपदुर्धरमांडिला ॥ २५ ॥ कृष्णमारीनहेंनिर्धारी ॥ वो
डणखांडेघतलेंकरीं ॥ पतंगजैसादीपकावरी ॥ तैशापरीधांविन्नला
॥२६ ॥ रुक्मियामहावीरनेटक ॥ वोडणखर्गांचासाधक ॥ सरकथर
कदावीचवक ॥ अतिनिःशंकनिजगडा ॥ २७ ॥ वोडणढकलूनीआद
ळित ॥ खर्चतोलोनिपेलित ॥ उल्हाळदेऊनीउसळत ॥ हातमिरवित
खड्गाचा ॥ २८ ॥ कृष्णजेजेबाणसोडी ॥ खड्गधारींतितुकेतोडी ॥
चारीमारावघायोर्डी ॥ रथाबुडींरिघोंआला ॥ २९ ॥ दारुकसारथीनि
जगढा ॥ रथाचाकरूंपाहेरगाडा ॥ कृष्णेंविंधिलाकऱ्हाडा ॥ रथाबुडीं

येऊंनेदी ॥ १३० ॥ बाणआदळलासत्राणें ॥ आडवेंवोडणधरिलेंते
णें ॥ वोडणभेदूनियांबाणें ॥ शिरींचामुगुटपाडिला ॥३१॥ कोपआ
लारुक्मियासी ॥ वेगेंधांविन्नलामोकळेकेशीं ॥ हातघांसोनिभूमीसी॥
हातींवशीखड्गातें ॥३२॥ कृष्णासीम्हणेदेखदेख ॥ घायींछेदीनेरमस्त
क ॥ विकटदेऊनियांहांक ॥ वेगींसन्मुखप्रगटला ॥ ३३ ॥ कृष्णेंविं
धिलेतिखटबाण ॥ ३३ ॥ तिळप्रायकेलेंवोडण ॥ खड्गछेदूनियांजा
ण ॥ अणुप्रमाणतेंहोकेलें ॥३४॥ बाणवर्षलाघनदाट ॥ रुक्मियाभु
लविलाआलीवाट ॥ रथलोटूनियांघडघडाट ॥ मौर्व्याकंठबांधिला
॥३५॥धनुष्यवाळूनियांगळां ॥ वोढोनिआणिलारथातळा ॥ कांपि
न्नलीभीमकबाळा ॥ घनसांवळादेखतअसे ॥३६॥ दाटूनआणिलाजी
क्रोधा॥झळपळितकाढिलीगदा ॥ याच्याकरीनशिरच्छेदा ॥ येरीथर
थरांकांपतसे ॥३७॥ कांहींनबोलवेसर्वथा ॥ म्हणोनिचरणावरीठेवि



लामाथा ॥ कृपाळुवाजगन्नाथा ॥ यासीसर्वथानमारावें ॥३८॥ कृष्ण
म्हणेपरतीसर॥येणेंनिंदाकेलीथोर ॥ याचेंछेदीनमीशिर ॥ म्हणोनिश
स्त्रउचलिलें ॥३९॥ तिखटदेखोनशस्त्रधारा ॥ चरणनसोडीचसुंदरा ॥
मृदुमंजुळउत्तरा ॥ गदाधराविनवीतसे ॥१४०॥ सुरांअसुरांतूंदुर्धर ॥
योगियांमाजीयोगेश्वर ॥ विश्वनियंताईश्वर ॥ वेदांपारनकळेची॥४१॥
ऐशियाशींतुजयुद्धीं ॥ आकळूंपाहेअहंबुद्धी ॥ पिताअवगणूनतूतेंनिं
दी ॥ होयअपराधीसर्वथा ॥ ४२ ॥ हाअभिमानियामारिशीरणीं ॥
मायप्राणसोडोलतत्क्षणीं ॥ होईललौकिकींटेहणी ॥ माहेरयेथूनि
तुटेल ॥ ४३ ॥ जेथुनिउठेनिंदाक्रोधू ॥ त्यालिंगदेहासींकरोछेदू ॥
मारूंनकोजेष्ठबंधू ॥ लोकविरुद्धनकरावें ॥ ४४ ॥ धरिलियाकृष्णा
चीकास ॥ द्यावादोहींपक्षींउल्हास ॥ नांदवावेंसावकाश ॥ येथेंतेथें
समत्वें ॥ ४५ ॥ नधरतचाललेंस्फुंदन ॥ नेत्रींलोटलेंजीवन ॥ झा

लेंकृष्णपदक्षालन ॥ जगज्जीवनहांसिन्नला ॥ ४६ ॥ देखूनिबोला
चीचातुरी ॥ मगउचलिलीदोहींकरीं ॥ आलिंगिलीप्रीतीथोरी ॥
बंधुनमारींसर्वथा ॥४७॥ मस्तकवपनाआणापाणी ॥ नाहींआडना
विहीररणीं ॥ घालावाटेचेंवाटवणीं ॥ विनोदमेहुणींमांडिला ॥४८॥
अर्धखांडअर्धमिशी ॥ पांचपाटकाढिलेशिरासीं ॥ विरूपकरूनीरु
क्मियासीं ॥ गळारथासींबांधिला ॥ ४९ ॥ रुक्मिणीसीम्हणश्रीकृ
ष्ण ॥ पाहेंबंधूचेंवदन ॥ वेगेंकरींनिंबलोण॥सकळजनहांसती॥ १५०॥
रुक्मियाचेंविरूपकरण ॥ यापरीकरीश्रीकृष्ण ॥ बळिरामयेउनीआप
ण ॥ बंधमोचनकरीलत्यासी ॥ ५१ ॥ परिउपहासमिषेंबोध ॥ रु
क्मिणीसीकरीलहलायुध ॥ एकाजनार्दनींविनोद ॥ परमानंदप्रगटे
ल ॥ ५२ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहि
तासंमतेरुक्मिणीस्वयंवरेरुक्मिपराभवोनामद्वादशःप्रसंगः ॥ १२ ॥

## प्रसंग १३ वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ येरांकडेदळभार ॥ देखोनिचालिलायादववीर ॥ लोट लेयेरयेरांसमोर ॥ घायेंनिष्ठुरहाणिती ॥ १ ॥ दक्षीणराजेंनिज भारीं ॥ युद्धपाहतीराहोनदूरी ॥ रुक्मियाक्षीणकेलाहरी ॥ कृष्णा वरीउठावले ॥ २ ॥ उरलेंरुक्मियाचेंदळ ॥ यादववीरींत्रासिलेंप्रबळ ॥ वर्षोनियांबाणजाळ ॥ वीरसकळभेदिले ॥ ३ ॥ यादवांच्यातिख टबाणीं ॥ निधडेवीरपडिलेरणीं ॥ धडमुंडांकितधरणी ॥ अर्धक्षणीं तिहींकेली ॥ ४ ॥ कृष्णेंरुक्मियाबांधिला ॥ उरल्यासैन्यापळसुट ला ॥ जयोयादवांसीआला ॥ मगपरतलाबळिभद्र ॥ ५ ॥ गजक रीखंदळी ॥ सरोवरामाजीकमळीं ॥ तैसीमर्दूनशत्रूफळी ॥ कृष्णा जवळीतोआला ॥ ६ ॥ रुक्मियाचेंविरूपकरण ॥ देखताझालासं कर्षण ॥ कृपेनेंद्रवलेंअंतःकरण ॥ दीनवदनदेखोनी ॥ ७ ॥ सोडो



नियांगळबंधन ॥ कृष्णासीम्हणेहेबुद्धीकोण ॥ सोयरीयासींविरूप करण ॥ तेंनिंद्यजाणआम्हांसी ॥ ८ ॥ शरीरसंबंधासीविरूपबांधू ॥ हातंववधाहूनिअधिकवधू ॥ तुवांथोरकेलाअपराधू ॥ सुहृदसंबंधुला जविला ॥ ९ ॥ याचावधतूंकरितासी ॥ तरीहापावतानिजसुखासीं ॥ ॥ मानदेऊनसोडींयासी ॥ सोयरिकेसीश्लाघ्यता ॥ १० ॥ क्षत्रिय सांपडेरणसांकडीं ॥ त्यासीघावींलेणींलुगडीं ॥ युद्धींखांडमिशीबो डी ॥ हेपरवडीत्वांकेली ॥ ११ ॥ सर्वचिम्हणेरुक्मिणीसी ॥ दोषन ठेवावाकृष्णासी ॥ जोजोकर्मेंकरीलजैसीं ॥ फळेंतैसींतोपावे ॥ १२ ॥ कृष्णनिजतत्वतत्वतां ॥ कर्मकरूनअकर्ता ॥ बंधुवैरूप्याचादाता ॥ नव्हेसर्वथाश्रीकृष्ण ॥ १३ ॥ तुझ्याबंधूचेंवैरूप्य ॥ तेंत्याचें त्यासफळलेंपाप ॥ हेंचिजाणभोगाचेंनिजरूप ॥ सांडींकोप सर्वथा ॥ १४ ॥ येथेंकर्तातोचिभोक्ता ॥ बोलनठेविंकृष्णमाथां ॥

ऐसीकर्ममर्यादातत्वतां ॥ हृदयींव्यथानधरावी ॥ १५ ॥ सर्वेचिम्ह णेश्रीकृष्णासी ॥ रणींविटंबूंनयेशूरासी ॥ बोललागलाक्षत्रियधर्मा सी ॥ हृषीकेशीहेंअनुचित ॥ १६ ॥ दंडायोग्यजरीअपराधू ॥ तरीनदंडावासोयराबंधू ॥ दंडापरिसअधिकबाधू ॥ नमारूनवधूत्वां केला ॥ १७ ॥ इतरांपासूनअन्यायझाला ॥ तोआपणपाहिजेक्षमा केला ॥ शेखींत्वांसोयरादंडिला ॥ बोललागलानिजधर्मा ॥ १८ ॥ जोआवडीनेंविषप्याला ॥ तोआपआपणामारकझाला ॥ त्याअन्या यादंडनाहींवहिला ॥ घातकेलानिजकर्मे ॥ १९ ॥ यालागींप्रवर्ते जोअधर्मेंसीं ॥ तेणेंचिकर्मेंदंडिलेंत्यासी ॥ मेलेंचितूंकांमारूंपाहसी ॥ रुक्मियासीजाऊंदे ॥ २० ॥ मेलियासीचमारणें ॥ तेंआम्हांसी चलाजिरवाणें ॥ विनोदनकरावामेहुणेपणें ॥ सोडूनदेणेंसर्वथा ॥ २१ ॥



सर्वेचिम्हणेरुक्मिणीसी ॥ कठीणकर्मक्षत्रियांसीं ॥ उल्लंघननकरवे आम्हांसी ॥ निजधर्मासीसर्वथा ॥ २२ ॥ विधात्यानेंनेमिलानेम ॥ क्षत्रियाचेंघोरकर्म ॥ दारुणमांडिलियासंग्राम ॥ आपपरनम्हणावा ॥ २३ ॥ समरंगणींसन्नद्धू ॥ सन्मुखआलियापिताबंधू ॥ रणांगणीं करितांवधू ॥ नाहींबाधूक्षत्रियां ॥ २४ ॥ ऐसेंजाणूनरुक्मिणी ॥ खेदनकरींवोमनीं ॥ सर्वेचिम्हणेशार्ङ्गपाणी ॥ विरुद्धकरणीत्वांकेली ॥ २५ ॥ राज्यलोभेंश्रीमदांध ॥ त्यासीउपजेकामक्रोध ॥ तेणें लोभेंहोऊनियांमंद ॥ थोरविरुद्धआचरती ॥ २६ ॥ आपुलेंराज्यजा तां ॥ कींपुढिलांचेंराज्यघेतां ॥ तेणेंस्वार्थेंक्रोधचित्ता ॥ उठेसर्वथाअ निवार ॥ २७ ॥ नातरीवृत्तिभूमीउच्छेदू ॥ होतांसज्ञानहोयमंदू ॥ तोहीकरूंलागेविरोधू ॥ निंदानुवादूद्वेषाचा ॥ २८ ॥ अथवाधना

गमनागमनीं ॥ प्रबळलोभउपजेमनीं ॥ वेदविक्रयकरिजेब्राह्मणीं ॥ धनालागींकलियुगीं ॥ २९ ॥ धनालागींवेदाध्ययन ॥ धनालागीं पुराणपठण ॥ धनालागींव्याकरण ॥ शास्त्रश्रवणवेदांत ॥ ३० ॥ धनालागींयेतीदान ॥ धनालागींहोतीसज्ञान ॥ धनालागींनीचसेवन ॥ उपसर्पणहीनाचें ॥ ३१ ॥ धनालागींदेहविकिती ॥ धनालागींदांभिकभक्ती ॥ धनकामनाकर्मेंकरिती ॥ नानावृत्तीधनेच्छा ॥३२॥ त्याधनासीहोयअवरोधू ॥ तेव्हांसज्ञानियासीउपजेक्रोधू ॥ विवेकियाहोयबुद्धिमंदू ॥ प्रबळविरोधूधनवंता ॥ ३३ ॥ आणीक एकथोरकारण ॥ जेव्हांहोयदाराहरण ॥ नविचारितीआत्ममरण ॥ वेंचितोप्राणस्त्रीलोभें ॥ ३४ ॥ अश्ववाहोतांमानहानी ॥ विवेकीहोयअभिमानी ॥ निंदाद्वेषउपजेमनीं ॥ ध्यानालागोनीसर्वथा ॥ ३५ ॥



कांआंगींचेनिशौर्यतेजें॥येरयेरांनिंदितीराजे ॥ वीर्यशौर्याचेनिमाजें ॥ अतिउन्मत्तहोउनी ॥ ३६ ॥ अणुमात्रस्वार्थाचाअवरोधू ॥ होतां समस्तांउपजेक्रोधू ॥ स्वार्थालागोनिनिरोधू ॥ पडेसंबंधूद्वेषाचा ॥ ॥ ३७ ॥ इतकींकारणेंसर्वथा ॥ तुजतंवनाहींकृष्णनाथा ॥ यारुक्मियाचीविरूपता ॥ कवणेंस्वार्थातुवांकेली ॥ ३८ ॥ तूंपरिपूर्ण आत्माराम ॥ तुजसर्वथानाहींकाम ॥ तरीकांकेलेंनिंद्यकर्म ॥ क्षत्रियधर्मेहानव्हे ॥ ३९ ॥ सर्वंचिम्हणेरुक्मिणीसी ॥ पावोनियांकृष्णचरणासीं ॥ विषमबुद्धीतुजपाशीं ॥ निजमानसींनधरावी ॥ ४० ॥ सुहृदुर्हृदउदासीन ॥ ऐसेंत्रिविधनकरींवोमन ॥ सर्वाभूतींसदापूर्ण ॥ पाहश्रीकृष्णसर्वदा ॥४१ ॥ अभद्रव्हावेंशिशुपाळासी ॥ कल्याण रुक्मियावांछिसी ॥ हेविषमतातुजपाशीं ॥ कृष्णसुखासींप्रतिबद्ध ॥४२॥म्हणसीशिशुपाळकृष्णद्वेषी ॥ सर्वदाअभद्रपाहिजेत्यासी ॥

मगतेचिदशारुक्मियासी ॥ तोहीकृष्णातेंद्वेषित ॥ ४३ ॥ हासर्वभूतात्माहृषीकेशी ॥ ऐशियाद्वेषितीजेकृष्णासी ॥ तैशियादुष्टांसोयरियांसी ॥ भद्रवांछिसीतेंअभद्र ॥ ४४ ॥ ऐशियासर्वभूतद्वेषियासी ॥ दंडमुंडनतेंकल्याणत्यासी ॥ तेंतूंअकल्याणमानिशी ॥ चतुरनव्हेसीनिजबोधें ॥ ४५ ॥ कृष्णज्ञानियाचतुर ॥ विनोदरूपेंकेलाउपकार ॥ रुक्मियाचानरकघोर ॥ यमप्रहारचुकविला ॥ ४६ ॥ कृष्णयुद्धींरुक्मियासी ॥ दंडनकरितांखांडमिशांसी ॥ तरीहाहोतारौरववासी ॥ अधःपातासीपैंजाता ॥ ४७ ॥ कृष्णसोयरियास्नेहाळू ॥ वपनरूपेंअतिकृपाळू ॥ केलेंनिजकरेंनिर्मळू ॥ फेडिलाविटाळद्वेषाचा ॥ ४८ ॥ यालागींकृष्णेंकेलेंतेंभद्र ॥ तूंकांमानितेसीअभद्र ॥ कृष्णज्ञानियांचानरेंद्र ॥ वेदांपारनकळेचो ॥ ४९ ॥ दुर्घटमोहपैंप्राणिया ॥ कृष्णेंकेलीअसेकृष्णमाया ॥ ब्रह्मादिकांनयेआया ॥



देवमायादेहबुद्धी ॥ ५० ॥ तयेदेहबुद्धीचेंलक्षण ॥ सुहृददुर्हृदउदासीन ॥ त्रिविधत्रिगुणनकरींमन ॥ देहाभिमानउपजवी ॥ ५१ ॥ ऐश्वर्यदेहतवजाणती ॥ देहनिमालियामृत्युमानिती ॥ देहसंबंधाअतिप्रीति ॥ येराद्वेषितीउपेक्षा ॥ ५२ ॥ नानाअलंकारींकनक ॥ तैसासर्वांभूतींआत्माएक ॥ हेंचिनेणोनियांमूर्ख ॥ एकासीअनेकम्हणताती ॥ ५३ ॥ अनेकांघटींजेवींअनेक ॥ प्रतिबिंबोनिभासेअर्क ॥ तैसाविश्वात्माविश्वव्यापक ॥ दिसेअनेकदेहयोगें ॥ ५४ ॥ आकाशएकलेंएकनिर्मळ ॥ मठींचौकोनघटींवर्तुळ ॥ विकारयोगेंभासेप्रबळ ॥ नव्हेकेवळनिजवाच्य ॥ ५५ ॥ तैसापरमात्माश्रीहरी ॥ एकाअनेकत्वातेंधरी ॥ नानाकारविकारी ॥ देहसंचारीदेहयोगें ॥ ५६ ॥ येथेंदेहासीचजन्मनाश ॥ आत्मानित्यअविनाश ॥ घटभंगेंघटाकाश ॥ सहजस्थितीजेवींविरे ॥ ५७ ॥

देहाचेंजन्मकारण ॥ महाभूतेंगुणप्रमाण ॥ अविद्येनेंकेलेंजाण ॥ जन्ममरणयालागीं ॥ ५८ ॥ अविद्येनेंनवलकेलें ॥ मिथ्यादेहींस त्यत्वदाविलें ॥ तेंचिअभिमानेंवेतलें ॥ प्रेमबांधिलेंदेहबुद्धी ॥ ५९ ॥ जयासीदेहाभिमानथोरू ॥ तयासीकल्पनाअनिवारू ॥ तेणेंचिदृढ मूळसंसारू ॥ येरझारनखुंटे ॥ ६० ॥ आतांऐकेंवोसुंदरी ॥ परमा त्माअलिप्तचराचरीं ॥ संयोगवियोगाचियेपरी ॥ नधरींसंसारींसर्व था ॥ ६१ ॥ आत्मसंयोगाविणेंसहसा ॥ स्वयेंसंसारचालेकैसा ॥ विकल्पनधरींवोऐसा ॥ तेहीदशासांगेन ॥ ६२ ॥ जैसारविअलिप्त आकाशीं ॥ दृष्टिरूपानिजप्रकाशी ॥ तैसापरमात्माहृषीकेशी॥ संसा रासीद्योतक ॥ ६३ ॥ नातरीजैसाखांबसूत्री ॥ अचेतनपुतळ्याना चवीयंत्रीं ॥ एकाजैत्यएकाहारी ॥ देईपरीअलिप्त ॥ ६४ ॥ पुत ळ्यांचेनिझालेपणें ॥ नाहींसूत्रधारियाजन्मणें ॥ तयांचेनिनिमालेप



णें ॥ नाहींमरणेंसर्वथा ॥ ६५ ॥ ऐसाअलिप्तकृष्णप्रसिद्ध ॥ तयासी दंडमुंडनअपराधू ॥ लावितेसीतूंनववधू ॥ नव्हेशुद्धभावतुझा ॥ ६६॥ कृष्णचालकवेगळेपणीं ॥ तरीव्यापकत्वाआलीहानी ॥ ऐ सेंनम्हणवेंवोरुक्मिणी ॥ तेहीकहाणीऐकपां ॥ ६७ ॥ जैसेंगगन आपणावरी ॥ शीतउष्णपर्जन्यधरी ॥ परीअलिप्ततिहींविकारीं ॥ तैसाश्रीहरीकर्मासी ॥ ६८ ॥ गगनसर्वत्रतत्त्वतां ॥ तयासीचिखल लाऊंजातां ॥ चिखलेंमाखिजेलाविता ॥ गगनसर्वथाअलिप्त ॥ ॥६९॥ तैसेंचिजाणकृष्णनाथा ॥ भोगभोगोनिअभोक्ता ॥कर्मकरोनी अकर्ता॥ अलिप्ततानिजबोधें ॥ ७० ॥ कृष्णाअंगींलावितांकर्म ॥ तोचित्यासीहोयअधर्म ॥ हेंचिकोणानकळेवर्म ॥ कृष्णनिष्कर्मसर्व था ॥ ७१ ॥ यालागींतूंऐसेंजाण ॥ आत्माअविनाशीपरीपूर्ण ॥ दे

हासीचजन्ममरण ॥ जीवींहेखूणराखावी ॥ ७२ ॥ लोकापवादबर
ळा ॥नाशमानितीकेवळा ॥चंद्रींचतुटतीचंद्रकळा ॥ म्हणतीनासलाअ
मावास्येसी ॥७३॥ चंद्रींचंद्रयथास्थिती ॥ जैशाकळातुटतीवाढती ॥
तैसाआत्मासहजस्थितीं ॥ नाशउत्पत्तीदेहासी ॥ ७४ ॥ जैशीवां
झेचीसंपत्ती ॥ तैशीसंसारउत्पत्ती ॥ भ्रांतीसत्यत्वेंमानिती ॥ मि
थ्याप्रतीतीप्रबुद्धां ॥ ७५ ॥ स्वप्नींदेखेआत्ममरण ॥ चितींवाळू
निदेहदहन ॥ जागृतीउदयींमिथ्यास्वप्न ॥ जन्ममरणत्यानाहीं
॥ ७६ ॥ तैसाचिजाणसंसारक्रम ॥ यालागींभीमकीसोडींभ्रम ॥ कृ
ष्णपावलीसीपुरुषोत्तम ॥ मिथ्याभ्रमकरूंनको ॥ ७७ ॥ स्वप्नींसो
यरियाझालेंदुःख ॥ सत्यमानितीतेतंवमूर्ख ॥ बंधूवैरूप्याचेंअसुख ॥
सोडींनिःशेषवेल्हाळे ॥ ७८ ॥ कृष्णनपावतांचिआधी ॥ शोकमोह



जीवासीबाधी ॥ कृष्णपावलियाआधिव्याधी ॥ जातीत्रिशुद्धीसर्वथा
॥ ७९ ॥ कृष्णपावलियापाठीं ॥ मोहममतातुझेपोटीं ॥ कृष्णनोळ
खसीवोगोरटी ॥ आत्मदृष्टीतुजनाहीं ॥ ८० ॥ आत्मदृष्टीचेंलक्ष
ण ॥ दृश्यद्रष्टाआणिदर्शन ॥ तिहींहोऊनियांअकारण ॥ परिपूर्णश्री
कृष्ण ॥ ८१ ॥ तेथेंकैंचेंध्येयध्यान ॥ ध्याताध्येयझालेंशून्य ॥
तुटलाबोलखुंटलेंमौन ॥ चैतन्यघनश्रीकृष्ण ॥ ८२ ॥ उरलेंचिन्मा
त्रस्फुरण ॥ तेंहीमायिकतूंजाण ॥ हेंतुझ्यांतनाहींलक्षण ॥ ऐसाश्री
कृष्णजाणावा ॥ ८३ ॥ ऐकोनिबळिरामाचेंवचन ॥ होतीकृष्णरू
पींसल्लग्न ॥ कृष्णमयझालेंमन ॥ तेणेंस्फुंदनचालिलें ॥ ८४ ॥
कृष्णभावझालाचित्ता ॥ गेलीदेहबुद्धीतत्त्वतां ॥ चरणावरींठेविला
माथा ॥ तिन्हीअवस्थासांडुनी ॥ ८५ ॥ वाचाझालीसद्गद ॥ निः

शेषखुंटलाअनुवाद ॥ सुखेंकोंदलापरमानंद ॥ पूर्णबोधभीमकीसी ॥ ८६ ॥ नाठवतीभावेदीर ॥ वृत्तीझालीतदाकार ॥ ब्रह्मरूपचराचर ॥ देखेसुंदरनिजबोधें ॥ ८७ ॥ देखोनिभीमकीचीनिजवृत्ती ॥ हरिखनमायेरेवतीपती ॥ उचलोनियांदोहींहातीं ॥ अतिप्रीतींमानली ॥८८॥ कृष्णबळिभद्ररुक्मिणी ॥ तिघेंमीनलींपूर्णपणीं ॥ परमानंदरणांगणीं ॥ भावेंरुक्मिणीभोगित॥८९॥कृष्णरुक्मिणीहलायुध ॥ तिघांझालाएकचिबोध ॥ एकाजनर्दनींआनंद ॥ परमानंदप्रगटला ॥ ९० ॥ ॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेरुक्मिणीप्रबोधेरुक्मिबंधनमुक्तिर्नाम त्रयोदशःप्रसंगः ॥ १३ ॥ ॥ श्रीकृष्णअर्पणमस्तु ॥ ॥

## प्रसंग १४ वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ यापरीकृष्णपत्नी ॥ रामेंप्रबोधिलीवचनीं ॥
रुक्मियादिधलासोडोनी ॥ विरूपपर्णींसलज्ज ॥ १ ॥ दीनहीनगे
लीकळा ॥ वीर्यशौर्यमुकलाबळां ॥ केवींमुखदाखवूंभूपाळा ॥ भी
मकबाळानसुटेची ॥ २ ॥ पित्यानेंम्हणितलेंनपुंसक ॥ त्यावचना
चेंमोठेंदुःख ॥ दावितांविरूपतेचेंमुख ॥ सकळलोकहांसती ॥ ३ ॥
प्रतिज्ञाकरूनीवाहिलीआण ॥ रणींविभांडोनश्रीकृष्ण ॥ भीमकी
आणीनमीजाण ॥ तोहीपणसिद्धीनपवेची ॥ ४ ॥ यालागींनवचें
कौंडिण्यपुरा ॥ लाजांराहिलाबाहेरा ॥ उभवोनीभोजकटनगरा ॥
वस्तीसीथारातेथेंकेला ॥ ५ ॥ रुक्मियासोडिल्याउपरी ॥ यादवां
च्यादळभारीं ॥ लागल्यानिशाणभेरी ॥ जयजयकारींगर्जती ॥ ६ ॥
यापरीतयेरणांगणीं ॥ जिणोनिमहावीरश्रेणी ॥ कृष्णेंआणिलीरुक्मि
णी ॥ अतिविंदाणीलाघवी ॥ ७ ॥ कृष्णनिघालावेगेंसी ॥ आ



लाप्रभासक्षेत्रासी ॥ तेथेंपूजोनीसोमनाथासी ॥ दुसरेचौपाशींदिध
लीं ॥८॥ पाहोनिसावकाशवाडी ॥ कटकउतरलेंनिरवडी ॥ हा
टचोहाटपरवडी ॥ घडामोडीवस्तूंची ॥ ९ ॥ राजेप्रजादेशदेशिक ॥
नगरनागरिकलोक ॥ उपायनेंजींअनेक ॥ येतीसन्मुखघेउनी ॥१०॥
जिंकोनिसळिकरायांसी ॥ विरूपकरूनिरुक्मियासी ॥ कृष्णेंनेलेंनो
वरिसी ॥ भीमकासीश्रुतझालें ॥ ११ ॥ ऐकोनिझालेंअत्यंतसुख ॥
जीवींनसमायेहरिख ॥ मजतुष्टलाआदिपुरुषएक ॥ भाग्यचोखभीम
कीचें॥१२॥मजपासूनिदोषासीजन्म॥परीदोघांचेंभिन्नकर्म॥भीमकी
पावलीपुरुषोत्तम ॥ विरूपकर्मरुक्मिया ॥१३॥ रुक्मियानिंदीकृष्णा
सी ॥ तेणेंकर्मेंवैरूप्यत्यासी ॥ भीमकीभावार्थेंकृष्णचरणासी ॥ अर्धांगा
सीतेपावली ॥१४॥ आपलाभावार्थचिजाण ॥ कृष्णप्राप्तीसीकारण ॥
यावेगळेंशहाणपण ॥ केवळजाणदंभार्थ ॥ १५ ॥ यालागींनिजभावें

सी ॥ शरणजावेंश्रीकृष्णासी ॥ भीमकीअर्पूनियांत्यासी ॥ हृषीके
शासीभजावें ॥१६॥ पाचारुनशुद्धमतीसी ॥ वृत्तांतसांगितलाति
येसी ॥ येरीम्हणेराहवाश्रीकृष्णासी ॥ कन्यादानासीविधिकरूं ॥१७॥
कन्यादानाचेनिमिषें ॥ कृष्णपूजूंसावकाशें ॥ पांचांपंचकांचेंफिटेल
पिसें ॥ अनायासेंमननिवे ॥१८॥ भीमकनिघालावेगेंसीं ॥ आलाप्र
भासक्षेत्रासी ॥ लोटांगणश्रीकृष्णासी ॥ निजभावेंसीघालित ॥१९॥
त्राहींत्राहींजीदातारा ॥ नेत्रींअश्रुचियाधारा ॥ कृपाउपजलीकृष्ण
वीरा ॥ वेगेंसामोराधांविन्नला ॥२०॥ उचलोनियांवेगेंसीं ॥ हृदयींधरीहृ
षीकेशी ॥ येरेंमिठीघातलीकमरेसी ॥ भावार्थेंसोमिसळला ॥२१॥ जी
वींच्याजीवाझालीभेटी ॥ कांहींकेलियानसुटेमिठी ॥ बापकृपाळूजग
जेठी ॥ पूर्णदृष्टींपाहिला ॥२२॥ सच्चिदानंदींझालावृप्त ॥ सबाह्य
देखेकृष्णनाथ ॥ फिटलाआर्तीचामनोरथ ॥ कृतकृत्यार्थपैंझाला



॥ २३ ॥ मगम्हणेजयजयाजीचक्रपाणी ॥ माझेंभाग्यतेरुक्मिणी ॥
विनटलीतुझ्याचरणीं ॥ कुलतारिणीचिद्रंगा ॥ २४ ॥ शुद्धकरी
तदोन्हीकुळ ॥ जेवींप्रवाहगंगाजळ ॥ तेवींजन्मलीहेबाळ ॥ सक
ळकुळाउद्धारी ॥ २५ ॥ श्रद्धाशांतीनिवृत्तिभक्ती ॥ तेहीभीमकी
निजमूर्ती ॥ तुजवोपिलीश्रीपती ॥ परीएकविनंतीपरिसावी
॥ २६ ॥ वीर्यशौर्यैंभीमकीहरण ॥ करितांनलगेअर्धक्षण ॥ आतां
विधियुक्तकन्यादान ॥ पाणिग्रहणकरावें ॥ २७ ॥ हेचिविनं
तीगरुडध्वजा ॥ चारीदिवसमाझीपूजा ॥ अंगिकारावीअधोक्षजा ॥
दासमीतुझानिजभावें ॥ २८ ॥ ऐकाश्रीकृष्णविंदान ॥ भक्ताआ
धीनहोयआपण ॥ भीमकीचेंपाणिग्रहण ॥ भावेंजाणकरीतसे ॥२९॥
होतेंश्रीकृष्णाचेमनीं ॥ संभ्रमेंपर्णावीरुक्मिणी ॥ देवकीसुभद्रादि
आणोनी ॥ महोत्साहकरावा ॥ ३० ॥ हेंचिभीमकीच्याचित्तीं ॥

सोहळ्यानेंवरावाश्रीपती ॥ हळदलावीनआपुलेहातीं ॥ बहुल्या प्रतीबैसोनी ॥ ३१ ॥ दोघांसींहीप्रीतिकर ॥ भीमकबोलिलानृपवर ॥ कृष्णासीमानलेउत्तर ॥ हर्षेंनिर्भरभीमकी ॥ ३२ ॥ कृष्णम्हणेज्येष्ठमाझा ॥ दादाजींसविनंतीकराजा ॥ रामनमस्कारीराजा ॥ चरणवोजाधरियेले ॥ ३३ ॥ कृष्णासीम्हणेबळिभद्र ॥ होसीकार्यार्थीअतिचतुर ॥ रामेंउठविलानृपवर ॥ अतिसन्मानपैंकेला ॥ ३४ ॥ राजाम्हणेश्रीहरी ॥ माझाआश्रमपवित्रकरीं ॥ आपुल्यादासातेंउद्धरीं ॥ कौंडिण्यपुरींत्वांयावें ॥ ३५ ॥ भीमकी म्हणेताता ॥ भाग्यैंपावलासीअनंता ॥ मागेंसरोंनयेसवर्था ॥ गृहममता सांडावी ॥ ३६ ॥ सर्वसामग्रीजिवेंभावेंसीं ॥ आवडींआणावी कृष्णापाशीं ॥ भावेंपूजिल्याहृषीकेशी ॥ सकळकुळासींउद्धार ॥ ३७ ॥ वचनेंमानिलाबळिदेवो ॥ ऐकोनिवदलादेवाधिदेवो ॥



पाणिग्रहणमुळमाधवो ॥ मुळिंचाठावोलग्नासी ॥ ३८ ॥ भीमकम्हणेकळलेंबीज ॥ कृष्णपूजनआमुचेंकाज ॥ धन्यधन्यमाझीआत्मज ॥ श्रीकृष्णनिजपावली ॥ ३९ ॥ इच्यावचनाचेंमहिमान ॥ पाहतां बुडोनगेलेंमन ॥ वचनेंपळविलाअभिमान ॥ मीतूंपणउडविलें ॥ ४० ॥ बापमाझेंभाग्यथोर ॥ कृष्णपरब्रह्मसाचार ॥ भीमकीयोगें चराचर ॥ ब्रह्माकारपैंझालें ॥ ४१ ॥ अवचटवंशींचाकोणी ॥ जो निवटलाकृष्णचरणीं ॥ तोचिसकळकुळातेंतारुनी ॥ परब्रह्मभुवनींनांदवी ॥ ४२ ॥ ऐशासुखाचेनिहरिखें ॥ राजाबोलिलानिज मुखें ॥ वचनभीमकेंचिकौतुकें ॥ आवश्यकमानिलें ॥ ४३ ॥ सेवक पाठविलेनगरासी ॥ वैभवसामग्रीवेगेंसी ॥ नगरनागरिकवासी ॥ मूळमाधवासीआणावे ॥ ४४ ॥ सर्वेचिविनवीकृष्णासी ॥ मूळपाठवाद्वारकेसी ॥ देवकीआणिवसुदेवासी ॥ सोहळ्यासींआणावें ॥ ४५ ॥

भावजाणोनीमानसीं ॥ संतोषलाहृषीकेशी ॥ मूळपाठविलेंद्वारके
शीं ॥ सोहळ्यासींआणावया ॥ ४६ ॥ पाचारूनिविश्वकर्म्यासीं ॥
आज्ञादिधलीमंडपासीं ॥ मूळमाधवींविशेषीं ॥ शोभाचौकासींआ
णावी ॥ ४७ ॥ मूळमाधवीअद्यापवरी ॥ वृक्षमात्रमंडपाकारी ॥ कृ
ष्णआज्ञापैंतरुवरीं ॥ अजुनवरीपाळिजे ॥ ४८ ॥ मूळमाधवाआला
हरी ॥ शोभादेखोनिसाजिरी ॥ संतोषलाश्रीहरी ॥ निजपरिवारीं
उतरला ॥ ४९ ॥ तीर्थस्नानकेलेंसहजीं ॥ मूळमाधवामाधवपूजी ॥
पूजाविधीसांगिजेद्विजीं ॥ पुण्यपुंजींऋषीश्वरीं ॥ ५० ॥ भीमकी
दिधलीभीमकापाशीं ॥ थोरउल्हासझालात्याशी ॥ कन्यानेलीनिज
मंडपासीं ॥ हृषीकेशीपासून ॥ ५१ ॥ कौंडिण्यपुरींचीआइती ॥
सकळसामग्रीसंपत्ती ॥ घेऊनआलीशुद्धमती ॥ भावेंश्रीपतीपुजाव
या ॥ ५२ ॥ कृष्णरुक्मिणीचेंदेख ॥ पहावयाविवाहसुख ॥ नगर



नागरिकलोक ॥ आलेसकळिकउल्हासें ॥ ५३ ॥ थोरउल्हासश्रीकृ
ष्णासी ॥ मूळेंपाठविलींरायांसीं ॥ कुरुसंजयकैकयांसी ॥ सोयरि
यांसीनिजलग्ना ॥ ५४ ॥ कृष्णविवाहमनोहर ॥ पाहोंआलेजीसुर
वर ॥ शिवशांभवयक्षकिन्नर ॥ वैष्णववीरनारदादि ॥ ५५ ॥ वऱ्हाड
निघालेंद्वारकेबाहेर ॥ गणेशचढलाउंदिरावर ॥ अग्रपूजेचाअधि
कार ॥ निर्विघ्नकरलग्नासी ॥ ५६ ॥ सिंहेंपसरिलेंजाभाडें ॥ दुर्गा
येउनीत्यावरीचढे ॥ मुक्तकेशखांडेंउघडें ॥ तेहिपुढेंनिघाली ॥ ५७ ॥
वेगेंआल्याअष्टमातृका ॥ एकीचढल्यवृश्चिका ॥ वाराहीतेसूकरमु
खा ॥ वऱ्हाडदेखानिघालें ॥ ५८ ॥ नेणतीवऱ्हाडिणीचर्बटा ॥
स्थूलउदरदांतथोटा ॥ उंदिराचढोनीलुटलुटां ॥ ढेरपोटाकांआ
ला ॥ ५९ ॥ विक्राळसिंहाचेंजाभाडें ॥ वाइलेंहातींउघडेंखांडें ॥
कोणीपाचारिलेंवऱ्हाडें ॥ अवघ्यांपुढेंनिघालीं ॥ ६० ॥ रोडकेंआं

गचढेन्नश्चिका ॥ कोणेंबोलाविलेंहेचंडिका ॥ फजीतीचेंवऱ्हाडदे
खा ॥ सूकरमुखाकांआली ॥ ६१ ॥ ऐसियांसीनेतांवऱ्हाडें ॥ व्या
हीहांसतीरोकडे ॥ यांसीराहवामागिलेकडे ॥ वऱ्हाडपुढेंचालोंद्या
॥ ६२ ॥ मिळोनीपांचांपंचकांचामेळा ॥ निंदूलागल्यात्याब
रळा ॥ कोपलागणमातृकांचामेळा ॥ तत्काळकाळारुसलिया
॥ ६३ ॥ गणेशेंविघ्नकेलेंगाढें ॥ ठायींठायींमोडतीगाडे ॥ रथीं
चेपांगुळलेघोडे ॥ वऱ्हाडपुढेंचालेना ॥ ६४ ॥ कोपलियामहामा
तृका ॥ शीतज्वरसोडिलादेखा ॥ दुर्गासोडीविषूचिका ॥ हगि
ओकिदेखासूटली ॥ ६५ ॥ ओकाओकीवऱ्हाडणी ॥ एकीम्हण
तीपाणीपाणी ॥ उठलीमाशांचीगोंगाणो ॥ सांडिलीपोहणीघा
लिती ॥ ६६ ॥ कृष्णासीलग्नाचीअतिगोडी ॥ कांनयेतीचद्वारके
चेवऱ्हाडी ॥ मार्गींकांहींपडलीआढी ॥ दूततांतडीपाठवीले ॥ ६७ ॥



दूतसांगतीश्रीहरी ॥ वऱ्हाडिणींसीलागलीशाहारी ॥ खटखटांवा
जतीदांतोरी ॥ रथींकुंजरींनबैसवे ॥ ६८ ॥ बहुतांझालीविषूचि
का ॥ गाडेमोडलेनिःशेषदेखा ॥ तुटलेरथांचेआंखएका ॥घोडेदेखापां
गुळले ॥ ६९ ॥ कृष्णम्हणेअबलामूर्खा ॥ उपहासिलेंविनायका ॥
क्षोभविल्यामहामातृका॥दुर्गादेखाकोपली ॥७० ॥कृष्णेंस्तविलेंविना
यका ॥ दिधलेंसाखरेचियामोदकां ॥ सुखझालेंगणनायका ॥विघ्नेंदेखा
निवारिलीं ॥७१ ॥ सुखशेवयाकुंकुमरेखा ॥ कृष्णेंपूजिलीअंबिका ॥
सन्मानूनीमहामातृका ॥ मंडपींदेखास्थापिल्या ॥ ७२ ॥ वऱ्हाड
पावलेंगजरें ॥ वाजतीनानापरींचींतुरें ॥ नरनारीअलंकारें ॥ केले
साजिरेरथगज ॥ ७३ ॥ श्रीकृष्णाचीनिजजननी ॥ देवकीबैसली
सुखासनीं ॥ करवलीसुभद्राबहिणी ॥ गजारोहणींमिरवली ॥ ७४ ॥
ज्येष्ठबंधूचीजेराणी ॥ रेवतीकृष्णाचीवहिनी ॥ यादवांच्यावऱ्हा

डिणी ॥ अनर्घ्यलेणींलेइल्या ॥ ७५ ॥ उग्रसेनवसुदेवासमान ॥ दोघांएकसारखाचीमान ॥ वऱ्हाडदाटलेंसंपूर्ण ॥ भेरीनिशाणेंगर्जती ॥ ७६ ॥ दोहींमंडपींझालीप्रतिष्ठा ॥ होमदिधलाहव्यवाटा ॥ द्विजपूजिलेबरवियांनिष्ठा ॥ वस्त्रेंज्येष्ठांअर्पिलीं ॥ ७७ ॥ आइतीकेलीशुद्धमती ॥ भीमकेंआणिलीशेवंती ॥ नोवराअभ्यंतरींश्रीपती ॥ यादवपंक्तीबैसले ॥ ७८ ॥ समाधिसुखतेंचि आसन ॥ मुक्तचौकेमंडपजाण ॥ बैसावयाश्रीकृष्ण ॥ भीमकेंविंदाणमांडिलें ॥ ७९ ॥ चारपुरुषार्थांचीचवाई ॥ तेंआसनत्यावरीपाहीं ॥ पूजावयानिजजांवइ ॥ भीमकोठायींतिष्ठत ॥ ८० ॥ म्हणती आचार्यसावधान ॥ शब्दसांडूनधरामौन ॥ वरवरिष्ठश्रीकृष्ण ॥ फलसंपूर्णत्याहातीं ॥ ८१ ॥ पहातांश्रीकृष्णाचेंरूपडें ॥ अनंतरूपें कृष्णचहूंकडे ॥ विस्मयभीमकझालेंवेडें ॥ मागेंपुढेंहरिदेखे ॥ ८२ ॥



अनंतरूपेंयादवपती ॥ कैसेनिमीपूजूंश्रीपती ॥ पूज्यपूजकतावृत्ती ॥ हेहीस्थितीनाठवे ॥ ८३ ॥ केवळप्रपंचतेंवऱ्हाड ॥ परीभीमकाचेंभाग्यवाढ ॥ पुरतपरमार्थाचेंकोड ॥ वऱ्हाडगोडत्याझालें ॥ ८४॥ उदकघालीशुद्धमती ॥ चरणप्रक्षाळीनृपती ॥ तीर्थचरणतीर्थमागती ॥ कृष्णपदप्राप्तीदुर्लभ ॥ ८५ ॥ कृष्णकपाळापावेकोण ॥ तेथेंहीसप्रेमचंदन ॥ भीमकेंअर्पिलेंशुद्धसुमन ॥ कृष्णभजननिजभावें ॥८६॥ शुद्धसत्त्वाचेंविरजांबर ॥ चिद्रत्नांचेअलंकार ॥ भीमकें अर्पूनियांअपार ॥ कृष्णवरपूजियेला ॥ ८७ ॥ भीमकगौरवीव्याहीयांसी ॥ व्याहीरूपेंदेखेकृष्णासी ॥ भूतमात्रींहृषीकेशी ॥ निजवृत्तीसींठसावला ॥८८॥वृद्धपरंपराऐसीआहे ॥ वरचरणउटींबहुमाये ॥ शुद्धमतीयेऊनिलवलाहें ॥ वदनपाहेकृष्णाचें ॥ ८९ ॥ मुगुट कुंडलेंकौस्तुभमाळा ॥ झळकतपीतांबरमेखळा ॥ देखोनियांघनसां

वळा ॥ दोहींडोळांनिवाली ॥ १० ॥ झणींलागलेबाह्यदृष्टी ॥ म्हणोनिघेतलीइटीमिठी ॥ निंबलोणउठाउठी ॥ करीगोरटीनि जभावें ॥ ११ ॥ कृष्णचरणालागींलावितांहळदी ॥ अहंभावें सीठकलीबुद्धी ॥ लाजविसरलीत्रिशुद्धी ॥ मीतूंउपाधीनाठवे ॥ १२ ॥ ज्याचेचरणींचेरजःकण ॥ शिवविरंचीआपण ॥ वंदितातीसांडू निगुण ॥ तेकृष्णचरणपावली ॥ १३ ॥ अक्षयवाणेंकरीआर ती ॥ कृष्णप्रभादीपदीप्ती ॥ कृष्णींलागलियापरमप्रीति ॥ चित्तवृत्तितद्रूप ॥ १४ ॥ चिच्छक्तिनसोडीचिन्मात्रा ॥ तेवींकृ ष्णाधाकुटीसुभद्रा ॥ माणिकेंमौक्तिकेंरत्नहारां ॥ दिव्यांबरांदी धलीं ॥ १५ ॥ शुद्धमतीम्हणेदेवकीशीं ॥ धन्यधन्यतुमचीकुशी ॥ जेथेंजन्मलाहृषीकेशी ॥ म्हणोनिपायांसीलागली ॥ १६ ॥ मग पूजिलीयथाविधीसीं ॥ वस्त्रेंभूषणेंअर्पिलींतिशीं ॥ जगन्निवासज



न्मलाकुशीं ॥ मान्यसकळांसीयालागीं ॥ १७ ॥ एवंभीमकआ णिशुद्धमती ॥ विनीतहोऊनिसर्वांप्रती ॥ वस्त्रेंभूषणेंअर्पिती ॥ सो यराश्रीपतीजोडिला ॥ १८ ॥ सावधानआचार्यम्हणती ॥ झा लीरुखवताचीआइती ॥ संतोषलीशुद्धमती ॥ भावेंश्रीपतीप्रार्थि ला ॥ १९ ॥ कृष्णपरमात्मामध्यमूर्ती ॥ आवरणपूजायादवपंक्ती ॥ लाविल्यास्वप्रकाशवाती ॥ शुद्धमतीसावध ॥ १०० ॥ तळींत्रिगु णाचीआडणी ॥ त्यावरीताटाचीमांडणी ॥ वाढितातीनवजणी ॥ रुखवतखावणीजाणोनि ॥ १ ॥ ऐकारुखवताचीस्थिती ॥ वाढितसेशु द्धमती ॥ जेजेंघालेकृष्णपंक्ती ॥ क्षुधापुढतीत्यांनलगे ॥ २ ॥ झळ कतीभावार्थाचीताटें ॥ जडितचतुर्विधचोखटें ॥ स्वानंदरसेंभरिलीं ताटें ॥ वोतूंकोठेंनेणती ॥ ३ ॥ खाणिवाखुडिवातोंडिवा ॥ त्रि गुणगुणांचासोलिवा ॥ शाकावाढितीस्वानुभावा ॥ हावभावफोड

णिया ॥ ४ ॥ एकेंपचलीगोडपणें ॥ एकेंसप्रेमलवणें ॥ एकेंनुसतीं
अलवणें ॥ बरवेपणेंमिरवती ॥ ५ ॥ एकेंसबाह्यअंबटें ॥ एकेंअ
धिकचीतुरटें ॥ एकेंबहुबीजेंकडवटें ॥ एकेंतिखटेंतोंडलीं ॥ ६ ॥
एकेंहिरवींकरकरीतें ॥ एकेंपरिपक्वेंनिश्चितें ॥ एकेंजारसेंकचक
चितें ॥ एकेंस्नेहदंठेंसूदलीं ॥ ७ ॥ वाळल्याअनुतापेंकाचरी ॥ वै
राग्यतळणेंअतिअरुवरी ॥ राजसावाढिल्याकोशिंबिरी ॥ नाना
कुसरीराइतीं ॥८॥ मुखींघालितांअतितिखटीं ॥ नाकींतोंडींधूरउठी ॥
कुससुसुनीकपाळपिटी ॥ दुसरेनगोष्टीनकरवे ॥ ९ ॥ एकेंवाळोन
कोरडीं ॥ तोंडींघालितांअतिकुडकुडीं ॥ त्यांचीअनारिसीगोडी ॥
बहुपरवडीस्वादाची ॥ ११० ॥ वळवटाचीनवलपरी ॥ एकपोकळेअ
भ्यंतरीं ॥ एकेंवर्तुळेंसाजिरीं ॥ सुमनाकारींपैंएक ॥ ११ ॥ परवडी
दावीयादवराया ॥ सूक्ष्मतंतूंच्याशेवया ॥ मांडोनिदेतांसगळिया ॥



अतिसोज्वळसतारा ॥ १२ ॥ शेवयावळिल्याअतिकुसरी ॥ असार
वळणमांडिलेंदूरी ॥ घोळिल्याक्षीरसाखरीं ॥ चवीजेवणारींजाणि
जे ॥ १३ ॥ अत्यंतलाडेंवळलेलाडू ॥ विवेकतिळयांचेजोडू ॥ सुर
सरसेंरसाळगोडू ॥ चवीनिवाडूहरिजाणे ॥ १४ ॥ पापडभाजिले
वैराग्यआंगीं ॥ तेणेंतेफुगलेसर्वांगीं ॥ म्हणोनिठेलेमागल्याभागीं ॥
नखेंसवेगींपीठहोती ॥ १५ ॥ उकलतांतेनउकलती ॥ आंतच्याआंत
गुंडाळती ॥ तापल्यातेलींतळिजेती ॥ कुडीआइतीकुरडिया ॥१६॥
भीमकीप्रियव्हावीश्रीपती ॥ सांडगीयानकरीचशुद्धमती ॥ जाणेत्र
ह्माचाररीती ॥ परमप्रीतीवधुवरांची ॥ १७ ॥ त्रिगुणत्रिकुटकाच
वीकाई ॥ भोकरेंखारलींठायींच्याठायीं ॥ कृष्णरंगेंरंगलींपाहीं ॥
आलेंठायींठेविलें ॥ १८ ॥ पुरणेंपरिपूर्णपोळिया ॥ सबाह्यगोडगुळव

रिया ॥ क्षीरसागरींच्याक्षीरधारिया ॥ इडूरियासकुमार ॥१९॥ सफे
तफेणियापदरोपदरीं ॥ शुद्धशर्कराभरलीभरीं ॥ अमृतफळेंठेविलीं
वरी ॥ अभेदधारगियावाढिल्या ॥१२०॥ नुसतीगोडियेचीघडली ॥
तैसीखांडवीवाढिली ॥ गगनगर्भींचीकाढिली ॥ घडीवातलीमांडि
यांची ॥२१॥ स्नेहदेठींहूनसुटलीं ॥ अत्यंतपरिपाकेंउतटलीं ॥ वनि
तांहातींहूनसुटलीं ॥ फळेंघातिलींशिकरिणी ॥२२॥ अत्यंतसूक्ष्मआ
णियाळें ॥ तांदुळांवेळियेंलेंसोज्वळें ॥ सोहंभावाचेंओगराळें ॥ भावब
ळेंभरियेलें ॥ २३ ॥ खालींनपडतांशीत ॥ नमाखतांवृत्तीचाहात ॥
ओगराळांभरिलाभात ॥ नफुटतवाढियेला ॥ २४ ॥ अन्नावरिष्ठव
रान्न ॥ विवेककोंडाकाढून ॥ अवघ्यावरीवाढिलेंजाण ॥ वरीवरान्न
स्वादिष्ट ॥ २५ ॥ लेह्यपेयचोष्यखाद्य ॥ भक्ष्यभोज्यादिप्रसिद्ध ॥



षड्रसांचेजेस्वाद ॥ केलेविविधउपचार ॥ २६ ॥ जिह्वेंचाटूनजेंघे
इजे ॥ लेह्यत्यानांवम्हणिजे ॥ घटघट्टनप्राशनकीजे ॥ पेयबोलिजे
तयासी ॥ २७ ॥ रसाचोखूनघेइजे ॥ बाकसथुंकोनीसांडिजे ॥
चोष्यत्यानांवबोलिजे ॥ खूणजाणिजेरसाची ॥ २८ ॥ अग्निंउदकल
वर्णेविण ॥ जेंजेंखावयायोग्यजाण ॥ खाद्यम्हणतीविचक्षण ॥ केलें
लक्षणसूपशास्त्रीं ॥ २९ ॥ क्षीरभातयानांवअन्न ॥ भोज्ययातेंम्हण
तीजाण ॥ रोटीपोळीआणिपक्वान ॥ भक्षणजाणयानांव ॥ १३० ॥
ऐसीषड्रसांचीगोडी ॥ तारटींवाढिल्यापरवडी ॥ चाखोंजातीजेगो
डी ॥ निजआवडीचेनिमुखें ॥ ३१ ॥ कृष्णस्वादांसीजाणताजाण ॥
अवधियांआणिलेंगोडपण ॥ यालागींवाढिलेंवरीलवण ॥ अपूर्ण
तेंपूर्णकरावया ॥ ३२ ॥ नाहींश्रद्धेचीजयांभूक ॥ आंगींअश्रद्धेचें

असुख ॥ गोडतेंचिम्हणतीविख ॥ थुंकोनदेखसांडिती ॥ ३३ ॥ कृष्णपंक्तीचीआवडी ॥ श्रद्धाक्षुधाजयागाढी ॥ ग्रासोग्रासींअधिकगोडी ॥ हेपरवडीत्यालागीं ॥ ३४ ॥ कृष्णपंक्तीनाहींउणें ॥ जेवितांजेवितेजाणतीखुणें ॥ रुचलेपणेंवाढितीजाणें ॥ सावधपणें शुद्धमती ॥ ३५ ॥ कृष्णदेखोनियांडोळां ॥ जीवाजीवनदेतीचपळा ॥ चतुर्विधसुपरिमळा ॥ येळावाळाउदादि ॥ ३६ ॥ चतुर्विधचारीमुक्ती ॥ शुद्धमतीपुढेंराबती ॥ जेंजेंपाहिजेज्याज्यापंक्ती ॥ तें तेंदेइजेतेठायीं ॥ ३७ ॥ पहिलेंवाढिलेंनवजणीं ॥ पूर्णकरितीचौघीजणी ॥ एकाजनार्दनभोजनीं ॥ अतृप्तकोणाराहूंनेदी ॥ १३८ ॥

॥ इतिश्रीमद्भागवतेमहापुराणेदशमस्कंधेहरिवंशसंहितासंमतेरुक्मिणीस्वयंवरेरुखवतवर्णनंनामचतुर्दशःप्रसंगः ॥ १४ ॥ ॥

## प्रसंग. १५ वा.



श्रीगणेशायनमः ॥ ॥शुद्धमतीनेंसगळे॥ नफोडितांरांधिलेकोहळे ॥च
वीआलेसोहंमेळे ॥ स्वादगोपाळेंजाणिजे ॥ १ ॥ धालेपणाचेंढेंकर ॥
स्वानंदेंदेतीजेवणार ॥ गोडीनित्यनवीअपार ॥ कृष्णदातारजेपंक्ती
॥ २ ॥ स्वादघेतीजेवणारे ॥ जेवितांकोणीनम्हणेपुरे॥ गोडीघेतलीशा
र्ङ्गधरें॥ भाग्यउदारेंशुद्धमती ॥ ३॥ सावधशुद्धमतीवाढी॥ यादवांचीतृ
प्तीझालीगाढी॥ ब्राह्मणांचीशेंडीतडतडी ॥ धोत्रेंबुडींढिलाविती ॥४॥
भीमककरीतसेविनंती ॥ अवघ्यांझालीपरमतृप्ती ॥ उष्टावणालागीं
श्रीपती॥ ठायींठेवितीनिजमुद्रा ॥५॥ देखोनआनंदलीशुद्धमती ॥ भी
मकीभाग्यवानकिती ॥ कृष्णमुद्राचढलीहातीं ॥ शेषप्राप्तीनिजभावें
॥६॥कृष्णपंक्तीजेंअन्नजेविले॥तेसंसाराआंचवले॥कृष्णरंगसुरंगझाले॥
विडेघेतलेसकळिकीं॥७॥ कृष्णदेखोनियांडोळां ॥ भीमकीच्यासख्या
सकळा ॥ विस्मितराहिल्यावेल्हाळा ॥ आणीकडोळांनावेड ॥ ८ ॥



कृष्णउच्छिष्टघेउनीहातीं ॥ वेगेंनिघेशुद्धमती॥ संतोषोनियांश्रीपती॥
प्रसाददेतीनिजमाळा॥९॥ कृष्णप्रसादसुमनमाळा ॥ शुद्धमतीघाली
गळां ॥ लाजविसरोनवेल्हाळा ॥ चरणकमळालागली ॥१०॥कृष्णा
सरुखवतशेवंती ॥ देतांनकळेदिवसराती ॥ ज्योतिषीरायातेंम्हणती ॥
उदयप्राप्तीहोऊंआली॥११॥वेगींमंडपासींचला॥घडवटेंआधींघाला ॥
उशीरनलावाजीफळा॥यादवांसकळांसांगिजे ॥१२॥ नमस्कारूनियां
श्रीपती ॥ मंडपाआलीशुद्धमती ॥ उष्टावणभीमकीहातीं॥ परमप्रीती
दीधलें ॥१३॥ कृष्णप्रसादधरिलामाथां॥भीमकीझालीरोमांचिता ॥
चित्तविसरलेंचित्ता ॥ सावधानताकृष्णशेषें ॥१४॥ जंवजंवकृष्णशेष
सेवी ॥ तंवतंवसमाधिसुखवांकुल्यादावी ॥ बापभाग्याचीपदवी ॥स्व
र्गींदेवींवाखाणिजे॥१५॥कृष्णमुद्राहृदयींधरी ॥अभिवंदूनियांशिरीं॥
मगघातलीकराग्रीं॥लेणउत्तरीशुद्धमती॥१६॥चढोनीपरेचियेउपरी ॥

सद्गुरुसावधानकरी ॥ घटिकाप्रतिष्ठिलीअंतरीं ॥ जीवनावरीसंख्येच्या ॥१७॥ घडीझंगटातेंहाणित ॥ झंगटतेणेंनादेंगर्जत॥काळगेलारेगेला म्हणत ॥ वेळव्यर्थजाऊंनदीजे ॥१८॥ अक्षरनिमिषपळेंपळ॥ घटिका भरतांनलागेवेळ ॥ लोकव्यापारेंबरळ ॥ गेलाकाळनेणती ॥१९॥ सद्गु रुसांगेभरलीघडी ॥ उगेंचपहातीवऱ्हाडी ॥ ज्यासींनिजकार्याचीतांत डी ॥ घडियाघडीतेसाधिती ॥२०॥ आळशीलोकनिद्रापर ॥ निजमंड पींकृष्णसादर ॥ विस्तारविफळसंभार ॥ नानाप्रकारमेचूचे ॥ २१ ॥ शून्यसांडुनीविरजांबर ॥ चिद्रत्नांचेअलंकार ॥ पदकींनिळामनोहर॥ जोशृंगारहृदयींचा ॥ २२ ॥ अहंकाराचेंबीजभरडी ॥ मोहममतेचा कोंडाकाढी ॥ सोलींवडाळीचीपरवडी ॥ भरलीदुरडीश्रद्धेची ॥२३॥ विवेकचाळणियाचाळी ॥ कणीकआणिलीतेजाळी ॥ निवडूनस्वा दाचीनव्हाळी ॥ ठेविलीमुळींनिजगोडी ॥ २४ ॥ देठींहुनीसुलटीं



फळें ॥ अत्यंतपरिपाकेंनिर्मळें ॥ घमघमीतसुपरिमळें ॥ सफळफळेंरु क्मिणी ॥२५॥ अंतरपटिंयेंभीमकबाळा ॥ गुणेंवीणसुमनमाळा ॥ अंगेंगुंफीघनसांवळा ॥ हारगळांआणिजाळी ॥ २६ ॥ सौभाग्यद्रव्येंठे विलींआधीं ॥ धनीपणेंधणेहळदी ॥जिरेंमेळविलेंत्यामधीं ॥ जेवींसबु द्धीविवेक॥२७॥गांठीसांडिल्यासोडुनी॥घेतलासूक्ष्मतंतुकाढोनी ॥श्री कृष्णवोवीकृष्णमणी ॥ तेरुक्मिणीभव्यगळसरी ॥ २८॥ सांडोनिक ठिणत्वाचेंबंड ॥ केवळरसाचेंप्रचंड ॥ कृष्णेंकृष्णवर्णइक्षुदंड ॥अतिउदं डआणिले॥२९॥ बीजेंवीणकाढिलींफळें ॥ एकत्वचेवीणरसाळें ॥ च मत्काराचींनिर्मळें॥कृष्णफळेंविस्तारी ॥ ३० ॥ फळविस्तारलेंप्रबळ ॥ यादवशृंगारलेसकळ ॥ भेरीत्राहाटिल्यापायदळ ॥ निशाणेंढोललाग ले ॥ ३१ ॥ अनर्घ्यलुगडींआणिलेणीं ॥ लेऊनिनिघाल्यावऱ्हाडि णी ॥ चारीबारासोळाजणी ॥ चौघीजणीतयांपुढें ॥ ३२ ॥जीवाशि

वानडिल्मान ॥ तैसेवसुदेवउग्रसेन॥संतोषवूनसंकर्षण॥करीपरिपूर्णय( चक्रां ॥३३॥ एकादिधलेंकांहींएक ॥ एकादिधलेंअनंतसुख ॥ चिद्रत्न अलौकिक॥ देऊनियाचक्रसुखीकेले ॥३४॥ फळचालिलेंगजरें॥ ढळ तीरत्नदंडचवरें॥ झळकतीछत्रेंपालवछत्रें ॥ दशविधतुरेंवाजती ॥३५॥ जैसीश्रद्धाआणिशांती ॥ तैसीचसुभद्राआणिरेवती ॥ मुख्यपणेंमाजी मिरवती ॥ घेतल्यावुंथीमायेच्या ॥ ३६ ॥ नानापरीच्यात्रेतल्याबुं थी॥ तरीअंतरशोभाबाह्यफांकती ॥ अलंकारींच्यानिजवृत्ती ॥ त्यांत झांकितीझांकल्या ॥३७॥ समीपफळआलेंदेखा ॥ ऐसेंजाणवलेंभी मका ॥ सावधानअतिनेटका ॥ भावेंबैठकाघातल्या ॥३८॥ सामो रायेऊनिआपण ॥ वसुदेवादिउग्रसेन ॥ नमस्कारूनिसंकर्षण॥भीतरीं जाणआणिलें ॥ ३९ ॥ विचित्रघातलींआसनें ॥ सकुमारमृदुपणें ॥ गाद्यापडगाद्याटेंकणें ॥ वोठंगणेंमृदोलिया ॥४०॥ भीतरींआलिया



वऱ्हाडिणी ॥ शोभतीजैशादिव्ययोगिनी॥ फळमांडिलेंविस्तारोनी॥ भावेंरुक्मिणीहरुषली॥ ४१ ॥ पीठस्थापिलेंकुसरी ॥ शृंगारोनियां नोवरी॥ वेगेंआणिलीबाहेरी ॥ मंत्रोच्चारींद्विजवरीं॥ ४२ ॥ पाहतां भीमकीचेंरूपडें ॥ अरूपरूपेंतेजगाढें ॥ मंडपामाजीउजेडपडे॥ आ णिकेकडेपाहोंनेदी ॥ ४३ ॥ नामरूपाचेनिप्रकाशें॥ अवघीभीमकी चभासे ॥ देखोनिजीवभुललेकैसे ॥ डोळ्यांपिसेंलाविलें ॥ ४४ ॥ उ भवूनीस्वरूपरूपठसा ॥ भुलविलेंआदिपुरुषा ॥ एकाएकींधांविन्नलाकै सा ॥ कृष्णपिसाइणेंकेला ॥४५॥ कृष्णशहाणपणेंअतिगाढा ॥ तो हीभीमकीनेंकेलावेडा ॥ वोढूननेलाआपुल्याकडा ॥ दुजेंपडिपाडाइसी नाहीं ॥४६॥ भीमकीलावण्याचीराशी ॥ कृष्णरूपाभाळलीकैसी ॥ सांडूनजातीकुळासी॥कृष्णस्वरूपासींविनटली ॥४७॥ भीमकीकृष्ण योग्यसहजें ॥ कृष्णरूपइसींचसाजे ॥ यासारिखेंनदेखोंदुजें ॥ बोलों

लाजिजेबोल्तां ॥ ४८ ॥ पाहतांभीमकीचीरूपरेखा ॥ ठकपडिलेंसक
ळिकां ॥ कृष्णपारखीगेनिका ॥ जोडानेटकामेळविला ॥ ४९ ॥ गोरे
पणेंअतिसुंदर ॥ विशाळनयनभाळथोर ॥ अंगेंसर्वांगेंसुकुमार ॥ मनो
हरउभारा ॥५०॥ कृष्णसाधावयानिधान ॥ नेत्रींसूदलेंअंजन ॥ पाह
तांभीमकीचेंवदन ॥ विकल्पमनकरूंनेणे ॥५१॥ भुवयासुरेखसरळना
सिक ॥ गंडस्थळींतेजअधिक ॥ नाकींचेंमोतींजडितमाणिक ॥ तेणेंश्री
मुखशोभतसे ॥ ५२ ॥ सरळबाहुसुपोष ॥ कोंपरमनगटेंगळस ॥
पांचाअंगोळियांविन्यास ॥ सकळान्यासमुद्रिका ॥ ५३ ॥ सुरंगतळवे
आणितळहात ॥ अधरबिंबअतिआरक्त ॥ बोलीमधुरतातळपत ॥
तेणेंझळकतदंतपंक्ती ॥५४॥ कटिप्रदेशेंशोभतजघन ॥ माजअतिशयें
सींसान ॥ घोटीकळावयासुलक्षण ॥ बरवेपणपाउला ॥५५॥ माथांमो
तिलगजाळी ॥ झळकेफरातळींहांसळी ॥ मिरवीभांगटिळाकपाळीं ॥



तेजझळाळीतानवडां ॥५६॥ नेसलीक्षीरोदकपाटोळा ॥ त्यावरीरत्ना
चीमेखळा ॥ सुनीळकांचोळीबेल्हाळा ॥ लेइलीआंगींमोतिलग॥५७॥
गंगातीरींचींचक्रवाकें॥तेवींकुचद्वयसुरेखें॥हृदयींघननीळझळके ॥ शो
भापदकेंदाविजे ॥५८॥ नाकींचेंझळकतसुपाणी ॥ तेणेंशोभतसेरुक्मि
णी ॥ शोभाआलीबाहुभूषणीं ॥ रत्नकंकणींकळाविया ॥५९॥ चरणीं
गर्जतीनूपुरा ॥ भुलोनमदनआलाउदरा ॥ तोहीभुलवीशार्ङ्गधरा ॥ कृ
ष्णनवरावराया ॥६०॥नाहींलग्नासींव्यवधान ॥ वेगींकराफळार्पण ॥
उठोनवसुदेवआपण ॥करीपूजनभीमकीचें ॥६१॥ पहिलेंकरावेंगणेश
पूजन ॥ तंवगणेशवंदीकृष्णचरण॥कृष्णदर्शनेंसमाधान ॥ गजवदनतु
ष्टला ॥६२॥ कृष्णपुरोहितनिष्काम ॥ नकरितीकलशपूजेचाकाम ॥
नवरीचेउपाध्येसकाम ॥ पुरुषार्थपरमदीधला ॥ ६३ ॥ वस्त्रेंअर्पुनीसुंद
री ॥वेगींनेलीअभ्यंतरी ॥ मायावसनेंत्यागकरी ॥ अंगिकारीश्रीकृष्ण

